कथाकल्पलता : : : : ३

# बाहुबली

लेखक

पं. महादेवशास्त्री जोशी

आवृत्ति पहिली

[ १९५५ ]

ज्ञानराज प्रकाशन, पुणें २

मूल्य सव्वा रुपया

प्रकाशक :
सौ. सुधा महादेव जोशी
ज्ञानराज प्रकाशनाकरिता
४२१ शनिवार पेठ, पुणें २

★

अंतर्गत सजावट :
भय्यासाहेब ओंकार
गंगाधर नाटके
जयंत दातार

★

मुखपृष्ठ :
दीनानाथ दलाल

★

ब्लॉक तयार करणार :
श्री. मोघे अँड सन्स, पुणें २

★



★

मुद्रक :
श्रीपाद जगन्नाथ गानू
राजगुरु प्रेस,
४०५ नारायण पेठ, पुणें २

# प्रथमारंभीं—

कथाकल्पलता या मालेचे हें तिसरें पुष्प. उज्जयिनीचा महाकाळ, सोमनाथ, मल्लिकार्जुन आणि रामेश्वर अशा चार ज्योतिर्लिंगांच्या उत्पत्तिकथा यांत दिलेल्या आहेत. एक बाहुबली सोडल्यास यांतली सर्व क्षेत्रें हीं शिवाच्या परिवारांतलीं आहेत. शिवोपासनेच्या निमित्ताने दक्षिणेत शिल्पकलेचा प्रचंड आविष्कार झाला. तिकडचीं मंदिरें आणि गोपुरे द्राविड शिल्पाचे नमुने म्हणून ओळखलीं जातात. भारतांतील प्रसिद्ध तीर्थक्षेत्रांच्या दर्शनानें मंदिरशिल्पाचे विविध प्रकार अभ्यासतां येतील. भारतीय संस्कृतीच्या विस्तारांत तीर्थक्षेत्रांचा फार मोठा वांटा आहे हे विसरतां कामा नये.

— **महादेवशास्त्री जोशी**

★ ★ ★

# बाहुबली

बाहुबलीची प्रचंड शिलामूर्ति ज्या गावात आहे, त्याचें नांव श्रवण बेळगोळ असें आहे. म्हैसूर संस्थानांतल्या चन्नरायपट्टण या तालुक्यांत हें ठिकाण येतें. म्हैसूरपासून याचें अंतर बासष्ट मैल आहे. श्रवण म्हणजे श्रमण अर्थात् जैन यति. बेळ म्हणजे शुभ्र आणि गोळ म्हणजे सरोवर. हे कानडी शब्द आहेत. सर्वांचा मिळून 'श्रमणांचें धवल सरोवर' असा अर्थ होतो. यालाच गोमटपूर असें दुसरें नांव आहे. इथें गांवांत आणि डोंगरावर मिळून एकंदर तीस मंदिरें आहेत. त्यांत सोन्या-चांदीच्या आणि रत्नांच्या किती तरी मूर्ती आहेत.



बाहुबली

या स्थानाच्या मागें सनपूर्व तिसऱ्या शतकापासूनची परंपरा आहे. त्या काळीं आचार्य भद्रबाहु आपल्या बारा हजार शिष्यांसह या ठिकाणीं आला. उत्तरेकडे बारा वर्षे भयंकर दुष्काळ पडला होता. या दुष्काळांतून आपल्या शिष्यांना वांचविण्यासाठीं त्यानें त्यांच्यासह दक्षिण भारतांत स्थलांतर केलें. भद्रबाहूच्याबरोबर त्याचा शिष्य चंद्रगुप्त मौर्यहि होता. श्रवण बेळगोळला आल्यावर भद्रबाहूला आपला अंतकाळ जवळ आल्याचें समजलें. मग त्यानें फक्त चंद्रगुप्ताला तेवढें आपल्यापाशीं ठेवून घेतलें

आणि बाकीच्या शिष्यांना चोल आणि पांड्य या राजांच्या प्रदेशांत पाठवून दिलें. मग भद्रबाहूनें चंद्रगिरीच्या एका गुहेंत समाधि लावली आणि आपला देह सोडला.

चंद्रगुप्त हा सम्राट अशोकाचा आजा होय. आपल्या गुरूच्या निर्याणा-नंतर तो त्या ठिकाणींच राहिला. गुरुचरणांच्या चिन्हांची पूजा आणि वैराग्ययुक्त तप करीत त्यानेंहि याच ठिकाणीं आपला देह ठेवला.

श्रवण बेळगोळ हें स्थान गेली दोन हजार वर्षे जैनांच्या संस्कृतीचें प्रधानकेंद्र ठरलें आहे. ही दिगंबर जैनमुनींची तपोभूमि आहे. जैन आचार्योंनीं इथें राहून विविध विषयांवर उत्कृष्ट ग्रंथरचना केली आहे. धवल, महाधवल यांच्यासारखे तत्त्वप्रधान ग्रंथ इथेंच निर्माण झाले आहेत.

या गांवाच्या उत्तरेस चंद्रगिरि आणि विंध्यगिरि असे दोन पर्वत आहेत. चंद्रगिरीहून विंध्यगिरि उंच आहे. बाहुबलीची सत्तावन फूट उंचीची विशाल मूर्ति आहे ती या विंध्यगिरीवरच. मूर्तीकडे जाण्यासाठीं खडक कापून पायऱ्या केलेल्या आहेत.

याच बाहुबलीच्या मूर्तीखालीं एक शिलालेख आहे. 'श्री चामुंडरायें करवियलें' एवढे एकच वाक्य त्या लेखांत आहे. आजवर उपलब्ध झालेल्या सर्व मराठी शिलालेखांत हा लेख प्राचीन आहे. त्यामुळें संशोधक याला फार महत्त्व देतात. या ठिकाणची ही बाहुबलीची प्रतिमा कोणीं घडविली तें या शिलालेखावरून कळतें. तीच कथा पुढें दिलेली आहे.

* * *

ऋषभदेव हा जैनांचा पहिला तीर्थंकर. नाभि राजा हा त्याचा बाप आणि मेरुदेवी ही त्याची आई. नाभि राजानें तपश्चर्या केली आणि साक्षात् श्रीविष्णु ऋषभदेवाच्या रूपानें अवतार घेऊन मेरुदेवीच्या पोटीं उपजला. नाभि राजानें राज्याभिषेक करून आपलें राज्य पुत्राच्या स्वाधीन केलें. ऋषभदेवानेंहि उत्तम प्रकारें प्रजेचें पालन केलें. तो महायोगी, मोठा ज्ञानी होता.

त्याला शंभर पुत्र झाले. त्यांतले अठ्याण्णव तरुणपणींच विरक्त होऊन ज्ञानमार्गाला लागले. उरला भरत आणि दुसरा बाहुबली. ऋषभदेव स्वर्गाला गेल्यानंतर दोघां भावांनीं आपसांत राज्याची वांटणी केली. भरत अयोध्येचा अधिपति झाला आणि बाहुबलीला तक्षशिलेजवळच्या पोद्नपूरचें राज्य मिळालें. दोघेहि बंधू आपापल्या राज्याचा कारभार पाहूं लागले. दोघांचींहि राज्यें समृद्ध झालीं.

कांहीं काळानंतर भरताच्या मनांत एक महत्त्वाकांक्षा निर्माण झाली. त्याला वाटलें कीं आपण चक्रवर्तिपद मिळवावें. पण चक्रवर्तिपद कांहीं सुखासुखी मिळत नाहीं. त्यासाठीं दिग्विजय करावा लागतो. भरतानें हळू-हळू तशी तयारी सुरू केली. त्यानें आपलें चतुरंग दल खूप वाढवलें आणि बलिष्ठ केलें. मग एका सुमुहूर्तावर रणशिंग फुंकून तो दिग्विजयासाठीं बाहेर पडला. त्याचा तो दळभार पाहून सर्व राजे लढाई न करतांच त्याला शरण आले.

शेवटीं उरलें बाहुबलीचें राज्य. सम्राट्पद मिरवायचें तर बाहुबलीलाहि मांडलिक बनविणें भाग होतें. भरत त्याच्याहि राज्यावर चालून गेला. त्याला वाटलें होतें कीं बाहुबलीहि आपल्याला शरण येऊन म्हणेल, 'तूं सम्राट अन् मी मांडलिक.'

पण तो सरळ युद्धालाच उभा झाला. तो कशाला आपला स्वाभिमान सोडील! त्याच्या दंडांत बळ होतें आणि त्याचें सैन्यहि जिद्दीचें होतें. भरताच्या दळभाराला त्यानें आपला दळभार नेऊन भिडवला. शस्त्रांचा खण-खणाट सुरू झाला. वीरगर्जना आकाशाचें कवच फोडून वर जाऊं लागल्या.

पण त्या उभय दळांचे सेनापती शहाणे होते, विवेकी होते. त्यांनीं विचार केला कीं, हें युद्ध दोघांनाहि महाग पडणार. दोन्हीकडचे वीरपुंगव निष्कारण धारातीर्थी पडणार. भरत आणि बाहुबली हे कांहीं एकमेकांचे वैरी नव्हेत. मग उगाच सैन्याचे प्राण कां खर्चीं घालावे ? त्या दोघांनींहि मग एकमत करून दोघांहि भावांना जवळ आणलें. ते म्हणाले कीं 'हें

युद्ध व्यक्तिशः तुम्हीं दोघांनीं करावें. ज्याचा जय होईल तो चक्रवर्ती ठरेल. दुसरा त्याचा मांडलिक बनेल. मात्र या युद्धांत अट एवढीच कीं, कोणी कोणावर प्राणघातक प्रहार करायचा नाहीं. व्यर्थ प्राणहानि नको; म्हणून आम्हीं ही तोड काढली आहे.'

सेनापतींची ही तोड दोघांहि भावांना मान्य झाली. मग ते दोघे समोरासमोर आले. त्यांनीं एकंदर पांच प्रकारांनीं युद्ध केलें. दृष्टियुद्ध,



भरत आणि बाहुबली यांचें युद्ध

जलयुद्ध, मल्लयुद्ध, गदायुद्ध आणि मुष्टियुद्ध. या प्रत्येक युद्धांत बाहुबलीच विजयी झाला. प्रत्येक वेळीं पराभव घेतांना भरताला वाटलें कीं, बाहुबली हा आपल्या मार्गांतला कांटा आहे. हा आपल्याला चक्रवर्तिपद लाभूं देणार नाहीं. याला उखडला पाहिजे. याला मारलाच पाहिजे. आणि त्यानें ठरलेला नियम मोडला अन् बाहुबलीच्या मस्तकावर चक्रप्रहार केला. पण

बाहुबली मरणें दूरच राहिलें. त्याचा रोमहि वांकडा झाला नाहीं. एवढा जबरदस्त प्रहार झेलूनहि तो पर्वतासारखा अविचल राहिला.

भरताचा सर्वस्वीं पराभव झाला. ज्या चक्रवर्तिपदाची त्यानें हांव धरली होती, तें त्याला न मिळतां बाहुबलीलाच मिळालें. बाहुबली सम्राट् झाला. सर्व राजे त्याच्या चरणीं नम्र झाले. त्यांनीं हिरेमाणकांचे नजराणे देऊन त्याचा खजिना भरून टाकला. सगळे भोगविलास त्याच्या पायाशीं लोळूं लागले. इच्छा आणि सिद्धि यांमध्यें क्षणाचेंहि अंतर उरलें नाहीं.

पण बाहुबली हा मुळांतच वीतराग होता. सर्व रसांत त्याला शांतिरसच प्रिय असे. मिळालेल्या साम्राज्यानें तो उच्छृंखल न बनतां अंतर्मुख बनला. त्याला वाटलें, कीं आपण भरताचा पराभव केला यांत काय मोठें शतकृत्य केलें? कामक्रोधादि अंतःशत्रू तर अजून माझ्या हृदयांत ठाण मांडून बसले आहेत. ते निर्भयपणें माझ्यावर आपला प्रभाव गाजवीत आहेत. खरें मर्दन त्यांचें करायला हवें. खरें साम्राज्य अंतःकरणांतलें मिळवायला हवें. त्यावांचून जन्माचें सार्थक नाहीं.

भोगविलासांच्या प्रभावळींत राहून हें काम होणार नाहीं. तिन्हीं त्रिकाळ सुग्रास अन्न जेवून काम-क्रोध हटणार नाहीत. हें सगळें सोडायला हवें. देह झिजवायला हवा, तापवायला हवा. हा निर्धार ठरतांच तात्काल तो सिंहासनावरून उतरला. त्यानें साम्राज्याचा त्याग केला. सर्वांच्या मनाविरुद्ध तो एक दिवस राज्यांतून बाहेर पडून वनवासी झाला.

प्रथम त्यानें आपलें अन्न तोडलें. मग जलाचाहि त्याग केला. त्याचा धिप्पाड देह काष्ठासारखा कृश झाला. सतत ध्यान, सतत चिंतन, यांत त्यानें स्वतःला बुडवून घेतलें. त्याला तिन्ही लोकांतलें कोणतेंहि ऐश्वर्य नको होतें. हवें होतें तें केवलज्ञान. जन्म-मृत्यूचे फेरे चुकवणारें आणि संसारबंध तोडणारें. पण तेंच त्याला गवसेना.

मग त्यानें त्याहून उग्र तप आरंभलें. तो वज्रासन घालून बसला. हालेना, डोलेना कीं उठेना. अनेक योगसिद्धी त्याच्यापुढें हात जोडून

उभ्या झाल्या. पण त्यानें त्यांना कःपदार्थ मानलें. जंगलांतले हिंस्र आणि साधेभोळे पशू, तसेंच लहानमोठे पक्षी त्याच्या आवतींभोंवतीं बसून शांतीचा अनुभव घेऊं लागले.

बाहुबलीला याचा पत्ताहि नव्हता. त्याचें अखंड ध्यान लागलें होतें. त्याच्या दोन्ही अंगीं वारुळें वाढलीं. त्यांत सापांनीं बिळें केलीं. त्यांतून कांहीं वेली उगवल्या आणि त्यांनीं वाढून बाहुबलीच्या भुजदंडांना वेढे घातले. त्याचे केस वाढत वाढत भूमीपर्यंत ओघळले. त्यांनीं त्याचें मुख-मंडलहि झांकून टाकलें. या गोष्टी घडायला किती दीर्घकाल लोटला असेल!

पण तरीहि त्याला केवलज्ञान भेटेना. त्याचा बंधु भरत याला अयोध्येंत ही गोष्ट कळली. आपला भाऊ साम्राज्य फेकून केवलज्ञानासाठी अपरंपार कष्ट भोगतो आहे याची त्याला जाणीव झाली. भरताला जरी बाहुबलीचें मांडलिक व्हावें लागलें होतें तरी त्यानें त्या गोष्टीचें किल्मिष मनांत ठेवलें नाहीं. बाहुबलीची थोरवी त्याला लवकरच कळली. त्यालाहि मग वाटूं लागलें कीं आपला बंधु ज्ञानानें कृतार्थ व्हावा. त्याच्यामुळें सर्व कुलाचें मुख उजळ व्हावें.

हा हेतु मनांत धरून तो एक दिवस आपल्या बापाकडे गेला. त्याचा पिता ऋषभदेव अजूनहि जिवंत होता आणि परमहंस वृत्तीनें वनांत रहात होता. भरतानें त्याच्याकडे जाऊन बाहुबलीविषयीं प्रश्न केला. त्यावर ऋषभदेव म्हणाला.

" बाहुबली साम्राज्याचा त्याग करून वनांत गेला हें खरें; पण आपण भरताच्या भूमीवर उभे आहों, ही भावना अजून त्याच्या मनांतून गेलेली नाहीं. त्याचें वैराग्य प्रखर आहे. साधनाहि तीव्र आणि अखंड आहे. पण ती भावना नष्ट झाल्यावांचून त्याला केवलज्ञान मिळणार नाहीं. त्याच्या सिद्धींत अडथळा असेल तर तो एवढाच. "

भरतानें तें लक्षांत ठेवलें. तो आपल्या राज्यांत आला. ब्राह्म आणि

सुंदरी अशा त्याच्या दोघी बहिणी होत्या. दोघीहि ब्रह्मवादिनी होत्या. त्यांना ही गोष्ट भरतानें सांगितली. त्यांच्यासह तो बाहुबलीकडे गेला.



बाहुबलीच्या दर्शनासाठीं भरताचें आगमन

साष्टांग नमस्कार घालून त्यानें आपण आल्याचें सांगितलें. बाहुबलीनें डोळे उघडतांच भरत त्याला नम्रपणें म्हणाला.

"बंधो, तुझ्या अंतर्गत अजूनहि माझें आणि तुझें ही भावना घर करून राहिलेली आहे. या मोहरूपी हत्तीवर तूं बसला आहेस. तिथून खालीं उतर म्हणजे तूं ज्यासाठीं एवढे अपार कष्ट सोसतोस, तें ज्ञान तुझ्या भेटीला येईल."

बाहुबलीला तें पटलें. त्याला जणूं परवलीचा शब्द सांपडला. आपल्या अंतरंगाचा ठाव घेतां माझें आणि तुझें ही द्वैतभावना याच्या तळाशीं बसली आहे हें त्याला उमगलें. त्यानें तिचा छेद केला. त्यासरशीं तिथें ज्ञानाचा प्रकाश पसरला. बाहुबली मुक्त झाला. मोक्ष मिळवून त्यानें आपलें जीवन धन्य केलें.

बाहुबली मोक्षाला गेल्यावर भरतान त्याची एक विशाल सुवर्णमूर्ति बनवून तिची पोद्नापुरांत स्थापना केली. कालांतरानें त्या प्रतिमेच्या आसपास कुक्कुट आणि साप यांची वस्ती वाढली. सभोंवती फार मोठें रान माजलें. वेलींच्या जाळ्या आणि झुडुपें यांच्या दाटीनें लोकांना तिथें जाऊन बाहुबलीच्या मूर्तीचें दर्शन घेणें दुर्लभ झालें. ती मूर्ति भव्य होती तशी सुंदर होती. तशा दंतकथा निर्माण झाल्या आणि त्या तेवढ्या सर्वत्र पसरल्या. शतकांमागून शतकें लोटलीं. मानवजातीच्या किती तरी पिढ्या उगवल्या आणि मावळल्या. बाहुबलीचें आख्यान पिढ्यान्‌पिढ्या जनता ऐकतच राहिली. पण भरतानें स्थापलेल्या त्याच्या त्या मूर्तीचें दर्शन मात्र त्यानंतर कोणालाहि झालें नाहीं.

अशा स्थितींत दहावें शतक उजाडलें. त्या काळांत दक्षिणेंत म्हैसूर प्रांतावर गंगवंशी राजघराणें राज्य करीत होतें. हे राजे जैन धर्माचे पुरस्कर्ते होते. तत्कालीन राजाचा चामुंडराय नांवाचा एक सेनापति होता. त्याच्या मातेला बाहुबलीच्या त्या सुवर्णप्रतिमेच्या दर्शनाची तळमळ लागली. ती मूर्ति ज्या कुठल्या जंगलांत असेल तिथून तिला शोधून काढावी, तिची पुनश्च चांगल्या ठिकाणीं प्रतिष्ठा करावी आणि हें कार्य आपल्या पुत्रानें हातीं घेऊन तडीस न्यावें, अशी आकांक्षा तिनें बाळगली. त्यासाठीं तिनें भोजन सोडलें. दूध पिणेंहि वर्ज्य केलें. ती खंगत चालली.

चामुंडराय हा मातृभक्त होता. आईची इच्छा त्याला कळली होती. पण राजकारणाच्या व्यापांत त्याला तशी सवडच मिळाली नव्हती. पण आई जेव्हां उपोषण आरंभून निकरावरच आली तेव्हां त्यानें प्रधानकीचीं सर्व कामें बाजूला टाकलीं आणि मातेची इच्छा पूर्ण करायचें ठरविलें. तिला घेऊन तो पोद्दनापुराच्या दिशेनें निघाला. पण त्याला आजच्या श्रवण बेळगोळ या स्थानापलीकडे कांहीं जातां आलें नाहीं.

मग त्यानें विचार केला कीं, जुनी मूर्ति शोधणें आणि सांपडणें अशक्य आहे. तेव्हां आपण नवीन एक मूर्ति निर्माण करून तिची स्थापना करावी. त्यानें या बाबतींत आपल्या गुरूचा विचार घेतला. त्यानेंहि मान्यता दिली. मग चामुंडराय तिथल्या चंद्रगिरि या पर्वतावर चढला. त्याच्यासमोर विंध्यगिरि हा दुसरा पर्वत होता. त्यानें चंद्रगिरीवरून एक सोन्याचा बाण विंध्यगिरीवर मारला. तो ज्या शिळेवर आदळला, त्याच शिळेंत त्याला बाहुबलीचा साक्षात्कार झाला.

त्यानें लगेच एका नामांकित शिल्पकाराला बोलावून घेतलें. त्याला घेऊन चामुंडराय त्या शिळेकडे गेला. त्या प्रचंड शिळेंत आपल्याला बाहुबलीचें मस्तक कुठें दिसलें, हृदय कुठें दिसलें, भुजा कुठें दिसल्या, मांड्या अन् पाय कुठें दिसले आणि हें सगळें कशा स्वरूपांत आणि कशा प्रमाणांत दिसलें, तें त्यानें शिल्पकाराला विशद करून सांगितलें. शिल्पकारानें तें सर्व लक्षांत ठेवून आपल्या सहकाऱ्यांसह कार्याला प्रारंभ केला. योग्य कालानें त्या प्रचंड शिळेचें तितक्याच प्रचंड मूर्तींत रूपांतर झालें.

ती मूर्ति पाषाणाच्याच कमलावर उभी होती. तिचे सर्व अवयव सुंदर, प्रमाणबद्ध आणि सामुद्रिक शास्त्राच्या दृष्टीनें निर्दोष होते. नेत्र अर्धवट उघडलेले, छातीचा भाग विशाल, भालप्रदेश उंच, दोन्ही कान दीर्घ आकाराचे, आजानु बाहू, मुखावर मंदस्मित, उदरावर त्रिवली आणि भुजदंडांना लतांचे वेढे. निळ्या आकाशाच्या छताखालीं ती काळी प्रचंड मूर्ति मनावर भव्यतेचें दडपण आणूं लागली.

चामुंडराय आणि त्याची माता यांनीं त्या मूर्तीचें दर्शन घेतलें. दोघां-नाहि परम समाधान झालें. माता भक्तिभावानें गद्गद् झाला. चामुंडरायाला पुरुषार्थाची इतिश्री झाल्यासारखें वाटलें. त्यानें मोठा समारंभ करून बाहुबलीची प्रतिष्ठा करायचें ठरवलें. मूर्तीला पंचामृताचा अभिषेक करण्याचा संकल्प केला. दहीं, दूध, इत्यादि पंचामृताचे हजारों घडे एकत्र केले. पण मूर्तीच्या मस्तकावर अभिषेक करायचा तर तिथवर हात कोणाचा पुरणार! कारण तिची उंचीच मुळीं चाळीस हात होती. मग चामुंडरायानें सभोंवतीं पहाड बांधला आणि घडे घेऊन लोकांना वर चढवलें. लोकांनीं ते घडे मूर्तीच्या मस्तकावर एकामागून एक धो धो प्रवाहानें ओतले. पण त्या पंचामृताच्या धारा जेमतेम त्याच्या कमरेपर्यंत आल्या आणि तिथेंच सुकल्या. चामुंडरायाला परम आश्चर्य वाटलें. एवढ्या हजारों घड्यांतल्या पंचामृतानें मूर्तिच काय; तो सबंध डोंगर न्हाऊन निघायला हवा होता. चहूं बाजूंनीं लोंढे वहायला हवे होते. पण हा कांहीं अद्भुतच प्रकार!

इतक्यांत पाठीला पोक आलेली, अंगाला सुरकुत्या पडलेली एक म्हातारी तिथें प्रगट झाली. ती कूष्मांडिनी देवीच म्हातारीचें रूप घेऊन तिथें आली होती. तिच्या हातांत पंचामृताची एक चिमकुली लोटी होती. तिनें चामुंड-रायाकडे बाहुबलीला अभिषेक करण्याची परवानगी मागितली. चामुंडराय हसला. जिथें हजारों घडे कःपदार्थ ठरले, तिथें या म्हातारीचें लोटीभर पंचामृत काय उपयोगाचें असें त्याला वाटलें. पण तरीहि तिचें मन दुखवूं नये म्हणून त्यानें तिला परवानगी दिली.

म्हातारी पहाडावर चढूं लागली. लटपटत लटपटत एकेक पावंडा सर करूं लागली. पहाणाऱ्या लोकांना वाटलें कीं, ही म्हातारी खालीं पडणार आणि प्राण सोडणार. पण तसें कांहीं झालें नाहीं. ती शेवटपर्यंत वर चढली. बाहुबलीच्या मस्तकाला हात पुरतांच तिनें आपली लोटी तिथें पालथी केली. पंचामृताच्या धारा सुरू झाल्या. गळयावर आल्या, छातीवर आल्या, कमरेवर आल्या, आणि पावलांना स्नान घालूनहि खालीं लोटल्या.

बाहुबलीची ती भव्योत्तुंग मूर्ति आपादमस्तक पंचामृतानें न्हाली आणि तरीहि धारा वहातच राहिल्या. खालच्या बाजूला सभोंवतीं तळें झालें. जमलेल्या हजारों प्रेक्षकांनीं तोंडांत बोटें घातलीं. 'आश्चर्य! आश्चर्य!!' असे उद्‌गार जनसमुदायांतून निघूं लागले.

आजवर कोणींहि केली नाही अशी भव्य शिलामूर्ति आपण निर्माण केली, असा चामुंडरायाला गर्व झाला होता. या अद्‌भुत प्रकारानें तो हरला. त्याला वाटलें, कीं ईश्वर कोणाच्या हातून काय घडवील, त्याचा नेम नाहीं. कर्तृत्वाचा अहंकार आपण मिरवूं नये हेंच चांगलें. प्रेरणा त्याची, शक्ति त्याची अन् आपण केवळ निमित्तमात्र! चामुंडरायानें मग बाहुबलीच्या तोरणद्वारावर त्या म्हातारीची मूर्ति कोरून त्या घटनेची स्मृति कायम केली.

---

# सोमनाथ

सोमनाथ हें क्षेत्र काठेवाड प्रदेशांत येतें. या क्षेत्राला लोहमार्ग आणि जलमार्ग या दोन्ही मार्गांनीं जाता येतें. लोहमार्ग पश्चिम रेल्वेचा आहे.



**सोमनाथ मंदिर**

मुंबईहून अहमदाबाद तिथून विरमगांव अन् तिथून पुढें सोमनाथ. बोटीनें जायचें तर मुंबईहून पोरबंदर, द्वारका आणि तिथून पुढें सोमनाथ. हे क्षेत्र फार पुरातन असून बारा ज्योतिर्लिंगांत पहिले आहे. या क्षेत्राला प्रभासक्षेत्र म्हणतात. त्रेतायुगांत यादवांचा संहार झाला तो या ठिकाणीं आणि श्रीकृष्णानें आपला अवतार समाप्त केला तोहि याच ठिकाणीं.

इथलें प्राचीन सोमनाथ मंदिर समुद्राच्या तीरावर आजमितीस भग्न अवस्थेंत आहे. गजनीच्या महंमदानें इ. स. १०२४ मध्यें तें भग्न केलें. ज्योतिर्लिंगहि तो फोडणार होता; पण तें त्याला साधलें नाहीं. म्हणून त्यानें मंदिराला आग लावून दिली. हें मंदिर अत्यंत वैभवशाली होतें. त्याला नीलमण्याचे ५६ खांब होते आणि त्यांना हिरेमाणकें जडवलेलीं होतीं. महंमदानें हें सगळें वैभव मोडून, तोडून, लुटून नेलें. त्यासाठींच त्यानें धाड घातली होती.

राजा भीमदेव, जयसिंह, कुमारपाल, राजा खंगार या नृपतींनीं पुनश्च सोमनाथाची प्रतिष्ठा केली आणि त्याचें वैभव वाढवलें. पण इ. स. १२९७ मध्यें पुनः अल्लाउद्दिन खिलजीनें तें उद्ध्वस्त केलं अन् लुटलें. उरलें सुरलें पंधराव्या शतकाच्या प्रारंभीं गुजरातच्या सुलतानानें लुटलें. सोमनाथाचें लिंगहि मंदिरांतून नष्ट झालें. या मंदिराची कलाकुसर आणि बांधणी उत्कृष्ट आहे हें आजच्या त्याच्या पडझडीच्या अवस्थेंतहि कळून येतें.

त्यानंतर किती तरी शतकें सोमनाथ उदासीन अवस्थेंत होता. तिथली वास्तुदेवता नशिबाला बोल लावीत अश्रू ढाळीत होती. सूर्य-चंद्र त्याची ही विपन्न अवस्था रोज पहात होते. पण १९४७ सालीं भारत स्वतंत्र झाला आणि त्याच्या सुपुत्रांचें लक्ष या प्राचीन पवित्र मंदिराकडे वळलें. ज्योतिःस्वरूप सोमनाथ त्यांच्या अंतरांत प्रविष्ट झाला. भारत सरकारनें सोमनाथाचा जीर्णोद्धार करायचें ठरवलें. नवें शिवलिंग निर्माण करण्यांत आलें. त्याला १०८ तीर्थांच्या जलानें स्नान घालण्यांत आलें. आणि ११ मे १९५१ रोजीं राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्तें त्याची पुनःप्रतिष्ठा झाली. १०१ तोफांच्या सलामीबरोबर ‘ जय सोमनाथ ’ ची गर्जना लक्षकंठांतून उठली.

* * *

फार प्राचीन काळीं दक्ष नांवाचा एक प्रजापति होता. विधात्यानें सृष्टीचा विस्तार करण्याचें कार्य त्याला सांगितलें होतें. या दक्षाला किती तरी मुली होत्या. त्यापैकीं सत्तावीस कन्या त्यानें एकट्या चंद्राला दिल्या. अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, इथपासून रेवतीपर्यंत जीं सत्तावीस नक्षत्रें आपण मोजतों त्याच या दक्षाच्या सत्तावीस कन्या होत.

चंद्र हा प्रसन्न आणि सुंदर; तसाच सोळा कलांनीं संपूर्ण. तेजोनिधि सूर्याकडून प्रकाश घेणारा आणि तो प्रखर प्रकाश सौम्य करून पृथ्वीवर पाठवणारा. चंद्राच्या चांदण्यानें चकोरांना भोजन मिळायचें. औषधी आणि वनस्पती यांना पोषण मिळायचें. मानवांच्या अंतःकरणाला आल्हाद

लाभायचा. सूर्यतापानें तप्त झालेल्या पृथ्वीला शीतल रुपेरी रसाचें स्नान घडायचें.

चंद्राचे हे विशेष गुण आणि त्याचें निहारतें रूप पाहून दक्षाला वाटलें कीं, हा आपला जांवई झाला तर फार चांगलें होईल. अश्विनी आदि त्याच्या सत्तावीस मुलींनाहि तो फार आवडला. त्याहि त्याच्या रूपगुणांवर भाळल्या. बापाची योजना आणि मुलींची आवड या दोन्ही गोष्टी एकत्र जमल्या आणि एके दिवशीं शुभमुहूर्तावर चंद्रानें त्या सत्तावीसहि मुलींचें पाणिग्रहण केलं. दक्षानें आपल्या जांवयाला मोठें आंदण दिलें आणि त्याचीं परोपरीचीं कौतुकेंहि केलीं. वरात निघतांना त्यानें चंद्राला एक गोष्ट आवर्जून सांगितली.

" जांवईबुवा, या माझ्या सत्तावीस मुली आज मीं तुम्हांला दिल्या. यांचा यथायोग्य प्रतिपाळ करा. यांत कोणी माझी आवडती नाहीं आणि कोणी नावडतीहि नाहीं. किंबहुना या सगळ्या मला सारख्याच आवडत्या आहेत. तव्हां तुम्हींहि त्याचप्रमाणें त्यांच्याशीं वागा. एकीला अधिक नको नि दुसरीला उणें नको. तुम्ही सर्वांशीं समानतेनें वागलांत कीं त्याहि गुण्यागोविंदानें घडून मिळून राहतील आणि तुमचा संसार सुखाचा करतील. हें माझें सांगणें कधींहि विसरूं नका. "

चंद्रानें ती गोष्ट मान्य केली. सासऱ्याला तसें अभिवचन दिलें. आणि तो प्रफुल्ल अंतःकरणानें सत्तावीस वधूंची वरात घेऊन आपल्या घरीं आला. त्याला वाटलें कीं आपल्यासारखा भाग्यवान् आपणच ! त्यानें पहिल्याप्रथम एक गोष्ट केली ती ही कीं, प्रत्येकीला एकेक स्वतंत्र घर बांधून दिलें. जरी त्या सख्ख्या बहिणी असल्या तरी एकत्र राहिल्यानें आपसांत कुरपटें काढतील, भांडतील, एकमेकींचा मत्सर करतील आणि त्यांचे तंटेबखेडे निवारतां निवारतां आपली तिरपिट होईल, या कल्पनेनें त्यानें ही आधींच सावधगिरी घेतली.

अश्विनी आपल्या घरांत राहूं लागली. भरणी आपल्या घरांत राहूं

लागली. रोहिणी आपल्या घरांत राहूं लागली. सगळ्या जणींनीं आपापले वेगळे संसार उभे केले, थाटले. चंद्रानें प्रत्येक दिवशीं एकेकीच्या घरीं जावें, तिथला पाहुणचार आणि सेवा घ्यावी, तिचें मन प्रसन्न करावें आणि दुसऱ्या दिवशीं दुसरीच्या घरीं दाखल व्हावें. सत्तावीस दिवसांत सगळ्या घरांची एक फेरी पुरी करावी. कोणाला अधिक नको, कोणाला उणें नको.

चंद्र याप्रमाणें वागूं लागला. त्यामुळें त्या सगळ्याच स्त्रिया सुखी झाल्या. कोणाचें भांडण नाहीं, कोणाची तक्रार नाहीं. सव्वीस दिवस आपल्या पतीची वाट पाहायची, सत्ताविसावा दिवस त्याच्या संगतींत घालवायचा आणि दुसऱ्या दिवशीं त्याची पुढच्या घरीं रवानगी करायची, असें चक्र नियमितपणें सुरू झालें. बराच काळ चंद्राचा संसार सुखानें चालला. जों-पर्यंत त्याच्या मनांत पक्षपात नव्हता तोंपर्यंत संसाराची घडी व्यवस्थित राहिली.

पण कालांतरानें चंद्राचें मन बिघडलें. त्याला कांहीं स्त्रिया आवडेनाशा झाल्या. कांहीं स्त्रिया अधिक प्रिय झाल्या. कांहीं स्त्रियांचीं घरें त्यानें उजव्या हाताला सोडायचीं, कांहीं बायकांना डाव्या हाताला वगळायचें आणि मधेंच एखादीच्या घरीं जाऊन आनंदोत्सव करायचा. त्यांतल्या त्यांत मघा, चित्रा, ज्येष्ठा या स्त्रिया त्याच्या विशेष आवडीच्या झाल्या आणि या सर्वांत अत्यंत आवडती आणि अतरंगांतली ती रोहिणी.

रोहिणीवर त्याचें एवढें मन बसायचें कारण म्हणजे ती फारच देखणी होती. वर्णानें आरक्त, कांतीनें रसरशीत आणि स्वभावानें लाघवी. तिच्या घरीं येतांना चंद्राचा जीव सर्वांगीं फुलायचा आणि तिच्या घरून निघतांना त्याचें मुख म्लान व्हायचें. जणूं आपलें हृदय तिच्या घरीं ठेवूनच तो पुढच्या प्रवासाला निघायचा. रोहिणी त्याचें कांहीं विशेष आगतस्वागत करीत होती असें नव्हे. इतर जणी जें करीत होत्या तेंच तीहि करीत होती. पण रोहिणीची प्रत्येक कृति त्याला सोन्याची वाटायची. तिचा प्रत्येक बोल त्याला अमृताचा बिंदु वाटायचा. आणि तिच्या डोळ्यांची प्रत्येक

उघडझांप त्याच्या अंतरांत कोमल भावनांची पेरणी करायची. तिच्या सत्कारानें तो मुग्ध होई, लुब्ध होई अन् हुरळून जाई.



चंद्रासवें रोहिणी

रोहिणीकडे होत असलेली त्याची ही विशेष सलगी थोड्याच दिवसांत इतर बायकांच्या नजरेस आली. जाऊं दे, होऊं दे म्हणून प्रथम कांहीं दिवस त्यांनीं तिकडे दुर्लक्ष केलें. पुष्कळशा गोष्टी दुर्लक्ष केल्यानेंच ताळ्यावर येतात अशी त्यांची समजूत होती. पण तिला चांगलाच धक्का बसला. दिवसेंदिवस त्याचें रोहिणीवरचें प्रेम वाढत चाललें आणि त्याच प्रमाणांत इतर जणींचा अनादर होऊं लागला. रोहिणी चंद्राचें सर्वस्व बनली आणि बाकीच्या सगळ्या कःपदार्थ! त्यांनीं चंद्राची सौम्य प्रमाणांत कानउघाडणी केली. त्याला कर्तव्याची जाणीव दिली आणि बापाच्या वचनाचीहि आठवण दिली. पण तो मुळीं कोणाचें कांहीं ऐकून घेण्याच्या मनःस्थितींतच राहिला नाहीं. त्याच्याबरोबर रोहिणीचाहि दंभ

वाढला. तीहि आपल्या नवऱ्याचें सर्वस्व झाल्याच्या अहंकारांत इतर बहिणींना क्षुद्र लेखूं लागली. त्यांच्याकडे बोलणें चालणें तर दूरच; पण पहायचें तेंसुद्धा हिणवण्याच्या भावनेनें.

त्या सव्वीस जणींना ही उपेक्षा आणि हा अपमान फार दिवस सहन झाला नाहीं. त्या सगळया जणी एकत्र जमल्या आणि सरळ बापाकडे गेल्या. एकमुखानें आणि एकमतानें त्यांनी आपलें दुखणें बापाला ऐकवलें. आपल्या पोरींच्या त्या म्लान मुद्रा, तें डोळ्यांतलें कारुण्य, तें चालण्या-बोलण्यांतलें दैन्य, हें सगळें पाहून दक्ष प्रजापति अंतरांत द्रवला. त्या मुलींची त्याला करुणा आली आणि त्याचबरोबर जांवयाचा क्रोधहि आला. आपला उपदेश धुडकावून लावून त्यानें आपल्या सव्वीस पोरींना हालताप भोगायला लावले, हा संताप त्याच्या मनांत प्रबळ होऊन उठला. त्यासरशीं मागचा पुढचा कांहींहि विचार न करतां त्यानें शापवाणी उच्चारली.

" चंद्रा, तूं क्षयरोगी हो !! "

आणि या शापाचा दुष्परिणाम ताबडतोब सुरू झाला. पहिल्या दिवशीं चंद्राची एक कला क्षीण झाली. दुसऱ्या दिवशीं दुसरी लुप्त झाली. तिसऱ्या दिवशीं तिसरी नष्ट झाली. चंद्र प्रतिदिनीं क्षीण होत चालला. आजची शक्ति उद्या नाहीं, उद्याची शक्ति परवां नाहीं. आपल्या शरीराची ही दुरवस्था आणि हा शक्तीचा ऱ्हास पाहून चंद्रानें हाय खाल्ली. त्याचा उत्साह संपुष्टांत आला. आपण आतां जगत नाहीं, आपला अंतकाळ समीप आला, असें त्याला वाटूं लागलें. त्याची लाडकी भार्या रोहिणी उदास झाली. तिच्याहि कळा लोपल्या. बाकीच्या स्त्रियांनाहि आपण केलें काय आणि झालें काय, असें झालें. त्यांचें सौभाग्यच संशयांत पडलें. त्याहि मंद, मलूल झाल्या. चंद्राबरोबर त्या स्वतःहि दुःख करूं लागल्या.

पण एवढ्यानेंच काय झालें होतें! साऱ्या सृष्टींतच त्यामुळें दैन्य पसरलें.



क्षीण चंद्र

चांदणें पडेना. चकोरांना उपास पडूं लागले. चंद्रकिरणांनीं उमलणारीं कुमुदें न उमलतांच माना टाकून पडलीं. औषधी वनस्पती खुरचटल्या. त्यांच्या पानांतलाच काय पण सालींतलाहि रस आटला. सोमवल्लीचीं रानें शुष्क झालीं. खालीं माणसांना फळें-फुलें मिळेनात. वर देवांना सोमरस लाभेना. पुरुषांचे चेहरे विवर्ण झाले. स्त्रियांच्या मुद्रा पांढऱ्या फिक्कट पडल्या. देव, यक्ष, गंधर्व, किन्नर या सर्वांच्याच कळा उतरल्या.

चंद्र जर असाच क्षयी राहिला तर सृष्टीची अवस्था बिकट होईल हें जाणून इंद्रादि देव आणि वसिष्ठादि ऋषिमुनी ब्रह्मदेवाकडे गेले आणि त्यांनीं त्याच्यापुढें आपलें गाऱ्हाणें मांडलें. चंद्रालाहि ते बरोबर घेऊन गेले होतेच. ब्रह्मदेवानें त्यांची ती केविलवाणी अवस्था पाहिली आणि आपल्या अधिकारवाणीनें त्याला उपाय सांगितला.



चंद्राचें तप

"चंद्रा, तुझ्या चुकीचेंच हें प्रायश्चित्त तुला मिळालें आहे. यापुढें तरी वडीलधाऱ्यांच्या आज्ञेचें उल्लंघन करूं नको. भूलोकावर जा. भरतखंडाच्या पश्चिमेस समुद्राच्या तीरीं प्रभास नांवाचें एक क्षेत्र आहे. त्या ठिकाणीं वास्तव्य कर. तिथें रोज त्या तीर्थांत स्नान करायचें आणि मृत्युंजय मंत्रानें भगवान् शंकराची आराधना

करायची हें व्रत घे. पडतील ते क्लेश सहन कर. शिवाला प्रसन्न करून घे. त्याच्या प्रसादानें तुझा हा दुर्धर रोग नष्ट होईल."

चंद्राच्या जिवांत जीव आला. देवांनाहि बरें वाटलें. त्यांनीं चंद्राला प्रभास तीर्थावर पोंचवलें. बसवत नव्हतें तरी चंद्र दांतीं बळ आणून अनुष्ठानाला बसला. मृत्युंजयाचा मंत्र जपूं लागला. सहा महिने त्यानें असें अखंड तप आचरलें. मंत्राचें दहा कोटी पुरश्चरण केलें. देवहि त्याच्या सोबतीला तिथें राहिले. त्यांनींहि आपल्यापरी शिवाची आराधना चालवली. आणि शेवटीं शंकर प्रसन्न झाला. जीवन्मृत अवस्थेप्रत पोंचलेल्या चंद्राला त्यानें अमरपद बहाल केलें. शिव म्हणाला.

"चंद्रा, शोक करूं नको. तुझा क्षय पूर्णपणें बरा होणार नाही. पण तरीहि तुला काळजी करण्याचें कारण नाहीं. कृष्ण पक्षांत प्रत्येक दिवशीं तुझी एकेक कला क्षीण होत जाईल आणि शुक्ल पक्षांत याच क्रमानें एकेक कला वाढत जाईल. प्रत्येक पौर्णिमेला तूं सोळा कलांनीं संपूर्ण होशील आणि चराचराला आनंद देशील !"

त्याच क्षणीं चंद्राचें मुख उजळलं. तो गहिंवरून शंकराच्या पायां पडला. सगळ्या देवांसह त्यानें शिवाची प्रार्थना केली.

"प्रभो, तूं भक्तांचा कल्पद्रुम आहेस. तूं या ठिकाणीं आतां प्रगट झाला आहेस, तो यापुढें ज्योतिर्लिंगाच्या स्वरूपांत इथेंच निरंतर रहा. जे भक्त तुझ्या दर्शनाला येतील त्यांचा उद्धार कर."

शिवानें तथास्तु म्हटलें. त्या दिवसापासून समुद्रतीरावरचें तें प्रभास क्षेत्र पापतापहरण करणारें तीर्थ म्हणून प्रसिद्ध झालें. वनराज सिंहाला पाहून ज्याप्रमाणें सर्व पशू पळत सुटतात त्याचप्रमाणें प्रभास क्षेत्राचें दर्शन होतांच मानवाच्या आधिव्याधी पलायन करतात.

# महाकाल

महाकाळ हें ज्योतिर्लिंग ज्या नगरांत आहे, त्याचें नांव उज्जयिनी. क्षिप्रा नदीच्या तीरावर बसलेलें मध्यभारतांतलें हें एक मोठें आणि प्राचीन शहर आहे. यालाच पूर्वी 'अवंती' असें म्हणत. अवंती ही सात मोक्ष-दायक पुऱ्यांपैकीं एक आहे. गुणिजनांचा चहाता, रसिक आणि उदार असा विक्रमादित्य राजा याच ठिकाणीं राज्य करीत होता. कालिदासादि संस्कृत कवींनीं या नगरीच्या वैभवाचें रसाळ आणि तपशीलवार असें वर्णन केलेलें आहे. इथें एक विक्रमादित्याचा संगमरवरी पुतळाहि होता. पण आक्रमक लुटारूंनीं त्याचा विध्वंस करून टाकला.



महाकाल मंदिर

महाभारतकाळीं या राष्ट्राचा विस्तार दक्षिणेला नर्मदेच्या किनाऱ्या-पर्यंत आणि पश्चिमेला महानदीच्या तीरापर्यंत झालेला होता. अवंतीच्या राष्ट्रिकांना आवंत्य असें म्हणत. एक व्यापारी पेठ म्हणूनहि उज्जयिनीला महत्त्व होतें. या ठिकाणीं ठिकठिकाणाहून घाऊक प्रमाणावर माल येई आणि इथून त्याचा व्यापार होई. इथें जे भव्य इमारतींचे अवशेष जागो-जाग सांपडतात, त्यांवरून उज्जयिनीच्या प्राचीन वैभवाची थोडीबहुत कल्पना येऊं शकते. सवाई जयसिंगानें या ठिकाणींएक वेधशाळा बांधली होती. महाकालीचें देऊळ आणि दौलतराव शिंद्यांचा राजवाडा, हीं या ठिकाणचीं प्रेक्षणीय स्थळें. महाकाळ हें तर यात्रास्थानच. या ठिकाणीं

चैत्र, कार्तिक आणि माघ या महिन्यांत मोठ्या यात्रा भरतात. दर बारा वर्षांनीं सिंहस्थ पर्वणीहि येते.

याच ज्योतिर्लिंगाला महाकाळ असें नांव पडलें, त्याच्यामागें एक कथा आहे. या ठिकाणीं एक अग्निहोत्री ब्राह्मण रहात होता. त्याला शिवाची परम भक्ति होती. रत्नमाल पर्वतावर रहाणाऱ्या दूषण नांवाच्या असुरानें एकदा उज्जयिनीवर आपल्या सैन्यासह हल्ला चढवला. सर्व लोक भयानें 'त्राहि त्राहि' म्हणूं लागले. त्या वेळीं या ब्राह्मणाची प्रार्थना ऐकून शंकर प्रगट झाला आणि त्यानें एकाच हुंकारांत त्या असुराला मारून टाकलें. भगवान् शंकर महाभयंकर असा हुंकार करीत करीतच इथें प्रगट झाला, म्हणून लोक त्याला 'महाकाळ' म्हणूं लागले.

एका काळी उज्जयिनी ही सुवर्णभूमि होती. इथलें शिवमंदिर गगनस्पर्शी आणि विशाल होतें. याचा सभामंडप स्थापत्यकलेचा एक सुंदर नमुना होता. मंदिराच्या एका कोपऱ्यांत सम्राट् विक्रमादित्याची सुवर्णमूर्ति स्थापलेली होती. पण तेराव्या शतकांत या स्थानावर यवनांचें आक्रमण झालें आणि महाकालेश्वराचे मंदिर त्यांनी मोडलें आणि लुटलें. इ. स. १७३४ मध्यें राणोजी शिंद्याचे दिवाण श्री. रामचंद्रबाबा यांनीं या मंदिराचा जीर्णोद्धार केला आणि कोटि-तीर्थांत टाकलेलें महाकालेश्वराचें लिंग वर काढून त्याची पुनश्च प्रतिष्ठापना केली. इथें देवाची त्रिकाळ पूजा होते. सकाळची पूजा चिताभस्माची असते. महाकालाचें लिंग विशाल आहे. त्याच्या दोहीं अंगी पार्वती, गणपति आणि कार्तिकेय यांच्या मूर्ती आहेत. प्राकारांत पुरातत्त्वखात्यानें जमवलेल्या प्राचीन मूर्तींचा संग्रह आहे. मानवजातीची उत्पत्ति प्रथम या ठिकाणीं झाली, अशीहि आख्यायिका आहे.

अलीकडे हें शहर बरेंच वाढलें आहे. इथें एक साखरेचा कारखाना आहे. शिवाय कापडाच्या गिरण्याहि आहेत. विश्वविद्यालय आणि एक मोठे ग्रंथालयहि आहे.

जिच्या कांठावर महाकाल वस्ती करून राहिला आहे, ती क्षिप्रा नदी

मध्य हिंदुस्थानांतून निघून उज्जयिनीवरून पुढें पवित्रा नदीला मिळाली आहे. हिच्या तीरीं पुष्कळ ऋषींचे आश्रम आणि तीर्थस्थानें आहेत. गंगा विष्णूच्या चरणकमलापासून निघाली, तर क्षिप्रा ही त्याच्या रक्तापासून निघाल्याची कथा आहे. इथले लोक म्हणतात कीं वर्षांतून कांहीं दिवस हिचें पाणी दुधासारखें शुभ्र असतें.

* * *

उज्जयिनी नगरींत प्राचीन काळीं चंद्रसेन नांवाचा राजा राज्य करीत होता. तो न्यायप्रिय, नीतिमान् आणि प्रजेविषयीं कनवाळू होता. थोर शिवभक्त म्हणूनहि त्याची ख्याति होती. तो अहर्निश शिवचिंतनांत निमग्न असे. शिवाचीं व्रतें आणि उपवास करण्यांत तो कधींहि आळस करीत नसे.

राजाला मित्र फारसे नसतात. पण चंद्रसेनाला मणिभद्र नांवाचा एक जिवलग मित्र लाभला होता. तो चतुर आणि सुजाण होता. त्याच्या संगतींत राजाला परम सुख लाभे.

या मणिभद्रानें राजाला एक बहुमूल्य मणि दिला होता. कुठल्याहि धातूचा त्याला स्पर्श झाला कीं तिचें सुवण बनावें हा त्या मण्याचा विशेष गुण होता. जीव–जिवाणू त्याच्या आसपास कधींहि फिरकत नसत. त्याचें दर्शन आणि स्पर्श होतांच अनेक रोग नाहीसे होत. तो ज्या राज्यांत असेल, त्या राज्यांत दुर्भिक्ष्य आणि अवषण कधींहि पडत नसे.

चंद्रसेन राजानें तो प्रकाशवंत मणि आपल्या गळयांत बांधला होता. त्याच्या तेजानें राजा जणूं दुसरा इंद्र असें वाटे. त्याच्याच सामर्थ्यावर समरांगणांत तो अद्भुत जय मिळवी. ता मणि हातीं आल्यापासून राजाला कोणत्याहि कार्यांत अपेश आलें नाहीं.

आणि हीच गोष्ट इतर राजांचा कपाळशूळ उठायला कारणीभूत झाली. चद्रसेनाची कीर्ति आणि समृद्धि त्यांना सहन होईना. पण त्याच्यावर

एकट्या कुणाची मात्रा चालण्याजोगी नव्हती. म्हणून त्यांनीं चंद्रसेनाच्या विरुद्ध आपला संघ उभारला. सगळे एकत्र मिळाले आणि अपार दळ घेऊन उज्जयिनीवर चालून आले. पहिल्या प्रथम त्यांनीं नगराला वेढा घातला. मग एका दूताकरवीं राजाला निरोप पाठवला. 'तुझ्याजवळचा तो सुप्रसिद्ध मणि आम्हांला दे, नाहीं तर युद्धाला सिद्ध हो.'




उज्जयिनीवर परचक्र

राजा विचारांत पडला. मणि द्यावा तर क्षात्रियत्वाला बाध येतो. न द्यावा तर युद्धाची आपत्ति. काय करावें त्याचा निर्णय होईना. शेवटीं तो

आपल्या आराध्य देवतेला शरण गेला. मंदिरांत जाऊन त्यानें विधियुक्त शिवपूजन आरंभिलें. राजा पूजेला बसला आणि एवढ्यांत शत्रूंनीं नगरावर संघटित हल्ला चढवला. राजाच्या हुकमाची वाट न पाहतां प्रधान सैन्यासह त्यांच्यावर तुटून पडला. सैनिकांच्या आरोळया उठूं लागल्या. महायंत्रांचे गुडुम् असे आवाज होऊं लागले.

पण या धुमश्चक्रीचा आपल्या मनावर यत्किंचितहि परिणाम होऊं न देतां चंद्रसेन शिवपूजेंत निमग्न राहिला. देवद्वारी वाद्यांचा कल्लोळ उठलेला ऐकून कित्येक भाविक लोक ती पूजा पाहायला त्या ठिकाणीं आले. त्यांतच एक गरीब विधवा गोपस्त्री होती. आणि तिच्याबरोबर सहा वर्षांचा एक बालक होता.

त्या बालकानें ती शिवपूजा नीट न्याहाळून पाहिली. पंचारतींच्या प्रकाशांत उजळून निघालेलें तें शिवलिंग त्याला अत्यंत आवडलें. राजा शिवाला कोणकोणते उपचार कशा पद्धतीनें समर्पितो, तें त्यानें मन लावून पाहिलें. मग शिवाचीं स्तोत्रें आणि जयघोष ऐकून तोहि त्या महाघोषांत सामील झाला. पूजा समाप्त होतांच गोपस्त्री त्या बालकाला घेऊन घरीं परत आली. बालक कडेवरून उतरला; तोंच बाहेर पळाला. 'अरे, निघालास कुठें ?' या आईच्या प्रश्नाला त्यानें उत्तर दिलें नाही. मागें वळूनसुद्धा पाहिलें नाहीं. जवळच एक गवताची मोडकीतोडकी झोपडी होती, तिथें तो गेला. तिथें आजूबाजूला बरेच दगड पडलेले होते. त्यांतला लिंगाच्या आकाराचा एक दगड त्यानें उचलून झोपडींत आणला. तो मधोमध उभा ठेवून त्याच्याभोंवतीं मातीची शाळुंका तयार केली. मग बाहेर जाऊन कोवळें हिरवें गवत तोडून आणलें. आजूबाजूला दिसलीं तीं वासाचीं, बिनवासाचीं फुलें खुडून घेतलीं. एवढीच त्याची पूजासामग्री. त्याला पूजेचें मंत्रतंत्र कांहींच ठाऊक नव्हतें. त्यानें फक्त राजानें केलेली पूजा लक्षांत ठेवली होती. तिचेंच अनुकरण त्यानें चालवलें. कुंकवाच्याऐवजीं तांबडी माती, रत्नांमाणकांच्याऐवजीं खडेगोटे आणि नैवेद्याच्या-

ऐवजीं कसलें तरी एखादें आंबटचिंबट फळ. हे उपचार तो एकामागून एक शिवाला वाहूं लागला. अशा रीतीनें षोडशोपचार पूजा झाली. सरतेशेवटीं त्यानें पुष्पांजलि वाहिली. जें काय करायचें तें प्रेमानें, शुद्ध भावानें केलें.

मग त्यानें आसन घातलें. नेत्र झांकून घेतले. कोवळे, गोंडस हात जोडून हृदयाशीं धरले. आणि तो ध्यानस्थ झाला. क्षण न लागतां त्याचें



चंद्रसेनाची शिवपूजा

बालमन एकाग्र झालें. त्यानें शिवाचा आकार घेतला. बाहेरचें शिवलिंग त्याच्या हृदयांत दाखल झालें. तो घराला विसरला, आईला विसरला अन् स्वतःलाहि विसरला.

आई स्वयंपाक करून मुलाला जेवूं घालण्यासाठीं हाक मारते, तर मुलगा आहे कुठें! हळू हाकांना उत्तर मिळेना म्हणून मग ती दीर्घ आणि उंच साद घालूं लागली. पण तरीहि मुलाची ओ नाहीं. मग तिनें शोधायला

सुरुवात केली. शेजारपाजार हिंडली तरी मुलगा कुठें दिसेना. मग तिला सहज वाटलें की माळावरच्या त्या जीर्ण झोपडीत एकवार पाहून यावें. तिथें जाऊन पाहाते तों काय ! मुलानें शिवलिंग मांडलें आहे आणि तो त्याच्यापुढें निश्चळ बसला आहे. हालत नाहीं कीं डोलत नाहीं. जसा कांहीं देवघरांतला नंदादीप ! तिला मुलाच्या स्थितीची कल्पना आली नाहीं. ती त्याला रागें भरून म्हणाली.

" कार्ट्या, इथें येऊन सासणलास होय ? मी केव्हांची तुला हाक मारतें. ऐकायला नाहीं आलं ? ऊठ आधीं, घरीं गिळायला चल. "

पण तरीहि मुलाकडून एक नाहीं कीं दोन नाहीं. तो मुळीं या जगांत नव्हताच. कुठल्या तरी दिव्य लोकांत त्याचा प्रवेश झाला होता. कुठली आई अन् कुठल्या हाका ! तो उठेना, बोलेना तेव्हां आईला वाटलें कीं, पोरगा मुरदाडपणा करतो आहे. त्यामुळें तिचा राग अधिकच वाढला. तिनें प्रथम तें लिंग उपटून टाकलें. त्यानें केलेली पूजा अस्ताव्यस्त केली आणि मग त्या बालकाच्या बखोटीला हात घातला.

खसदिशीं ओढतांच बालकानें नेत्र उघडले. त्यानें समोर पाहिलें, तर त्याची शिवपूजा विस्कटून टाकलेली आहे. आईच्या हाताला हिसडा देऊन त्यानें स्वतःला सोडवून घेतलें. आपली पूजा भग्न झाली हें दुःख त्याला अनावर झालें. तो रडूं लागला. ' शिव शिव ' म्हणून छाती पिटूं लागला आणि दुःखावेग असह्य झाल्यामुळें शेवटीं धरणीवर मूर्च्छित पडला.

पोराच्या छांदिष्टपणापुढें हद्द आहे, असें म्हणून आईनें त्याचा नाद सोडला. ती त्याला तसाच टाकून घरीं गेली. तिनें भोजन केलें आणि मुलाचें अन्न झांकून ठेवल. जेवण झाल्यावर एक जुनेर पांघरून ती गवताच्या चटईवर झोपीं गेलीं.

इकडे त्या जीर्ण झोपडींत दयाळु शंकरानें अद्भुत नवल वर्तवलें. तो आशुतोष उमारमण बालकाच्या भोळया भक्तीला प्रसन्न झाला. जें मोडकळीस आलेलें तणार होतें, त्याचेंच त्यानें रत्नखचित शिवमंदिर बनवलें.

नाना रत्नांचे कळस त्याच्यावर झळकूं लागले. देवळाला चार द्वारें आणि गाभाऱ्यांत मणिमय दिव्यलिंग. त्या ज्योतिर्लिंगाची प्रभा गाभाऱ्यांत आणि बाहेर पसरली. बालक मूर्च्छेतून सावध होतो तों त्याच्या दृष्टीपुढें हें महान् आश्चर्य ! त्यानें केलेली पूजा राजोपचारांची झालेली. बालक ब्रह्मानंदानें नाचूं लागला. शिवाची नामावलि उच्चारूं लागला. शिवानें त्याच्यापुढें प्रगट होऊन त्याला म्हटलें. ' बाळा, मी प्रसन्न आहें. तुला हवा तो वर माग. '

बालकानें हात जोडले. तो म्हणाला, ' महादेवा, माझ्या आईनें तुझी पूजा मोडली, तो तिचा अपराध पोटीं घाल. ' चंद्रमौलीनें ' तथास्तु ' म्हटलें.



गोपबालक – श्रीकर

मातेला शिवदर्शनासाठीं आणावें, म्हणून तो घरीं गेला. पहातो तर आपल्या झोपड्याचा कायापालट होऊन त्याला सुसज्ज वाड्याचा आकार आला

आहे. त्यांत धनधान्याची समृद्धि झाली आहे. आईचेंहि रूप पालटलें असून ती दिव्य मंचकावर पहुडली आहे. त्यानें तिला जागें केलें आणि म्हटलें.

" आई! आई! शिवाच्या दर्शनाला चल. "

ती डोळे उघडून पहाते तर सगळीच अद्भुत करणी! तिला पटलें कीं, मुलाच्या शिवभक्तीचा हा प्रसाद आहे. तिनें त्याला हृदयाशीं धरलें. त्याच्या मस्तकावर आनंदाश्रूंचा अभिषेक केला. तो आईला घेऊन मंदिरांत आला. त्या जीर्ण झोपडीचें लखलखीत शिवमंदिरांत झालेलें रूपांतर पहातांना तिच्या नेत्रांना टक पडलें.

ती धावतच राजवाड्याकडे गेली. तिनें राजाला हें अद्भुत वर्तमान सांगितलें. राजा त्वरेनें त्या ठिकाणीं आला. त्याच्या पाठोपाठ नागरिकांचे पाळेहि तिकडे लोटले. राजाला त्या बालकाच्या शिवभक्तीची विलक्षण थोरवी वाटली. त्यानें अभिमान सोडून बालकाचे पाय धरले. सगळया प्रेक्षकांकडून बालकाचा जयजयकार उठला.

ही वार्ता नगराबाहेर युद्ध करणाऱ्या चंद्रसेन राजाच्या शत्रूंनाहि कळली. ज्या नगरींत साक्षात् शंकर प्रगट होतो ती नगरी आणि तो राजा आपल्याला अजिंक्य आहे असें त्यांना वाटलं. त्यांनीं द्वेष आणि दुर्वासना टाकून दिली. त्याच क्षणीं युद्धहि थांबवलं. ' चंद्रसेन राजा, आम्ही तुझ्याशीं मैत्री इच्छितों. आम्हांला तुझ्या नगरांत येऊं दे. तो शिवभक्त बालक धणीवरी पाहूं दे. ' असा त्यांनीं चंद्रसेनाला निरोप धाडला.

चंद्रसेन आनंदित झाला. त्यानें त्या राजमंडळाची भेट घेऊन त्याला मिरवीत नगरांत आणलें. त्या अवंती नगरीची रचना पाहून त्यांना आश्चर्य वाटलें. अवंतीची गणना सप्तपुरींत झाली आहे हें उचितच होय असें ते म्हणाले. सकल राजे त्या अद्भुत शिवमंदिराकडे गेले. त्यांनीं बालकासह त्या ज्योतिर्लिंगापुढें लोटांगण घातलें.

एवढ्यांत अंजनीचा पुत्र हनुमंत त्या ठिकाणीं प्रगट झाला. त्यानें त्या

बालकाला हृदयाशीं धरून शिव-पंचाक्षरी मंत्र उपदेशिला. प्रदोष आणि सोमवार हीं शिवव्रतेंहि त्याला सांगितलीं. श्रीकर असें त्या बालकाचें नांव ठेवलें. 'तुला चौदा विद्या, चौसष्ट कळा प्राप्त होतील' असा त्याला आशीर्वादहि दिला. मारुतीनें जातां जातां पुढचें भविष्यहि त्याला सांगितलें.

"बाळा श्रीकरा, तूं मोठा होशील. तुझा वंशवेल विस्तारेल. आठव्या पिढीला गोकुळांत नंद नांवाचा गोपपति जन्म घेईल. भगवंताचा आठवा अवतार श्रीकृष्ण पुत्ररूपानें त्याच्या घरीं येईल. तो कंसाचें कंदन करील. शिशुपाळ, वक्रदंत, कौरव इत्यादि दुष्ट राजांना मर्दील आणि पांडवांचा प्रतिपाळ करील."

एवढें बोलून मारुति गुप्त झाला. बालकाच्या भक्तीसाठीं प्रगट झालेल्या त्या ज्योतिर्लिंगाला 'महाकाळ' असें नांव पडलें आणि त्या दिवसापासून तिथें सगळया भरतखंडांतून यात्रा सुरू झाली.

# मल्लिकार्जुन

मद्रास प्रांतांतल्या कृष्णा नांवाच्या जिल्ह्यांत कृष्णेच्या कांठींच जो पर्वत आहे त्याला श्रीशैल म्हणतात. दक्षिण कैलास अशीहि त्याला दुसरी संज्ञा आहे. दक्षिण रेल्वेच्या नंद्याळ स्टेशनावर उतरून तिथून बसगाडीनें अठ्ठावीस मैलांवरच्या आत्माकूर या गांवीं प्रथम जायचें. तिथून पुढें बारा मैलांवर नागाहुटी हें स्थान लागतें. या स्थानापासून मल्लिकार्जुन एकतीस मैल दूर आहे. डोंगराचा रस्ता आहे खरा; पण वाटेंत विश्रांतिस्थानेंहि आहेत. या ठिकाणीं कृष्णा नदीला पाताळगंगा असें म्हणतात.



मल्लिकार्जुन मंदिर

पुराणांतरी याचें माहात्म्य बरेंच वर्णिलेलें आहे. महाभारताचें सांगणे आहे कीं श्रीशैल पर्वतावर जाऊन जो तिथल्या ज्योतिर्लिंगाचें पूजन करील त्याला अश्वमेध यज्ञाचें फळ मिळेल. याच क्षेत्राच्या उत्पत्तीची कथा पुढीलप्रमाणें आहे.

* * *

शंकर आणि पार्वती हीं जगाचीं मातापितरें असलीं तरी त्यांचे असे पुत्र दोन. एक षडानन आणि दुसरा गजानन. षडाननाला सहा तोंडें तर गजाननाला हत्तीची सोंड. दोन्ही मुलगे अगदीं मुलखावेगळे. पहिल्यानें

आपलें वाहन म्हणून मोराला जवळ केलें; तर दुसरा म्हणाला, मला आपला उंदीरच ठीक आहे.

पार्वती दोघांवरहि माया करी. तिच्या चंद्रमौळी संसारांत हे दोन मुलगे, हेंच तिचें वैभव होतें आणि तेंच आनंदाचें स्थान होतें. शिव संसारी असूनहि भस्म फांसून बसलेला. त्याला आपलें ध्यान आणि समाधि यांशिवाय कशाचेंच कौतुक नव्हतें. त्यामुळें पार्वतीलाच त्यांचें सर्व कांहीं करावें लागे.

पण मुलगे विलक्षण द्वाड. खोड्या करण्यांत एकापेक्षां एक सरस. गणपति अंगानें स्थूल आणि बृहदुदर; त्यामुळें त्याला पळणें कठीण जाई. षडानन अंगानें सडपातळ; त्यामुळ विलक्षण चपळ. तो गजाननाची खोडी काढून केव्हांच पसार व्हायचा. मग गणपति आईकडे गाऱ्हाणें घेऊन यायचा.

" आई, बघ हा षडानन. माझे कान उपटतो अन् पळून जातो.."

मग पार्वतीनें त्याला जवळ घ्यायचें, त्याच्या तोंडावरून कौतुकाचा हात फिरवायचा अन् षडाननाला जरा रागानेंच हाक मारून विचारायचें.

" काय रे षडानना ! चावटपणा फार वाढला तुझा. गणपति तुझा भाऊ ना ? अन् त्याचे कान उपटतोस ? "

" मग तो माझ डोळे कां मोजतो ? आपली सोंड उचलतो, माझ्या तोंडावरून फिरवतो अन् म्हणतो कीं ' एक डोळा...दोन डोळे...तीन डोळे...चार......"

" बरं, बरं ! कोणी कमी नाहीं तुमच्यांत. दोघेहि न भांडतां खेळा. समजलं ? "

अशा प्रकारें खेळत, भांडत ते दोघेहि कैलासावर वाढले. दोघांनींहि तारुण्यांत पदार्पण केलें. पार्वती त्या दोघांच्या लग्नाचा विचार करूं लागली.

तिला सुना घरांत आणण्याची घाई झाली होती. तिनें शंकराशीं या बाबतींत विचारणा सुरू केली. आपलें आतां लग्न व्हायचें आहे अन् आई–बाप सध्या त्याच गोष्टीचा विचार करीत आहेत, ही गोष्ट त्या दोघांनाहि कळली.

झालें. तिथेंहि भांडणाला प्रारंभ झाला. गणपति म्हणाला, 'माझं लग्न आधीं व्हायला हवं.' त्यावर षडानन बोलला. 'अरे वा रे! मी मोठा भाऊ आहें तुझा. माझंच लग्न आधीं होईल. रीतच आहे तशी.' पण गणपतीला तें पटेना. तो बोलला कीं 'तें होणं नाही. तुझ्या आधीं मी बोहल्यावर चढणार.' षडाननानें त्यावर उत्तर दिलें कीं 'बेस मनांतले मांडे खात. माझंच लग्न आधीं होईल. पहाशील तूं.'

हा दोन भावांमधला झगडा शेवटीं शिवपार्वतींच्यापुढें आला. दोघेहि हट्टाला पेटून बोलूं लागले. पार्वती दोघांपैकीं कोणालाच आवरूं शकेना आणि दुखवूंहि शकेना. शेवटीं शंकरानें एक तोड काढली. तो दोघांनाहि समोर बोलावून म्हणाला.

"हें पहा मुलांनो! तुम्हीं आपसांत भांडून इथलें शांत वातावरण बिघडवूं नका. मी तुम्हांला एक ताड सुचवतों. दोघांनींहि पृथ्वीप्रदक्षिणा करावी. जो कोणी ती संपवून आधीं परत येईल, त्याचें लग्न आधीं करायचें. तुम्हांला हा पण कबूल आहे?"



षडाननाची पृथ्वीप्रदक्षिणा

"कबूल, कबूल!" दोघांनींहि उत्तर दिलें.

षडानन ताबडतोब त्या मोहिमेवर दौडला. गणपतीनें ताडलें कीं या स्पर्धेत आपला टिकाव लागायचा नाहीं. षडानन आहे सडपातळ अन् चपळ. आपण पडलों असे स्थूलदेही. तेव्हां तो आपल्याला केव्हांच मागें टाकील. त्याच्याबरोबर पळण्यांत कांहींच हंशील नाहीं.

मग तो विचार करूं लागला कीं आपला कार्यभाग कसा साधेल? पण थोड्या वेळांत त्याला एक युक्ति सुचली. त्यासरशीं त्यानें चुटकी वाजवली. तो उद्गारला. 'षडानना, पळ! खुशाल धाप लागेपर्यंत पळ. शेवटीं ही स्पर्धा मीच जिंकणार. तुझा धावाधाव फुकट जाणार...'

मग त्यानें पूजासाहित्य सिद्ध केल. शिव-पार्वती एकत्र बसलीं आहेत अशी संधि पाहून तो पुढें गेला. त्यानें त्या दोघांचे पाय धुतले. शिवाला चंदनाचा लेप केला. पार्वतीला हळद-कुंकू दिलें. त्या दोघांच्या गळ्यांत फुलांचे हार घातले. नैवेद्य म्हणून ताजीं फळें पुढें ठेवलीं. मग त्यांच्या-भोंवतीं एक प्रदक्षिणा करून शेवटीं साष्टांग नमस्कार घातला.

शिव प्रसन्न झाला. पार्वतीहि खुष झाली. शिव हंसून बोलला.

"काय गजानना! आज अगदीं आईबापांच्या भक्तीचा कळस करतो आहेस?"

गजाननाच हात जोडलेलेच होते. तो नम्रतेनें बोलला.

"देवाधिदेवा! शास्त्र-पुराणांत सांगितलं आहे की जो आईबापांची पूजा करून त्यांना प्रदक्षिणा घालतो, त्याला पृथ्वीप्रदक्षिणा केल्याचं श्रेय मिळतं."

"अर लबाडा! असा कावा होता होय तुझा? तरी म्हटलं—" शिवानें म्हटलें.

"शास्त्रवचन जर खरं असेल तर मीं पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केली आहे अन् ती षडाननाच्या आधीं. तुम्ही या गोष्टीला मान्यता द्या अथवा शास्त्रवचन खोटं ठरवा."

शिवाला अन् पार्वतीलासुद्धा त्याच्या बुद्धिमत्तेचें कौतुक वाटलें. त्यांनीं एकमेकांकडे साभिप्राय पाहिलें, त्यांत हाच कौतुकाचा अर्थ होता. शिवानें

मान्य केलें कीं, गजाननानें षडाननाच्या आधीं पृथ्वीप्रदक्षिणा पुरी केली अन् ठरलेला पण जिंकला.



गजाननाची शिवपूजा

गणपतीच्या आनंदाला पारावार उरला नाहीं. तो मनांत म्हणाला कीं 'जिथें शक्ति पुरी पडत नाहीं, तिथें युक्ति सफळ होते.' त्यानें मग पार्वतीला सांगितलें, कीं षडानन येण्याच्या आधीं आपलें शुभमंगल पार पडलें पाहिजे. त्यानें आपल्या हृदयांतली आणखी एक गोष्ट आईला सांगितली.

"आई, माझं लग्न तर करायचं; पण मला भार्या दोन हव्या. एक उजव्या हाताला चवरी वारायला अन् दुसरी डाव्या हाताला."

पार्वतीनें त्याची तीहि गोष्ट मान्य केली. मग ती अनुरूप वधूंचा शोध घेऊं लागली. तिला कळलें कीं विश्वरूप प्रजापतीच्या सुंदर, शालीन आणि चतुर अशा दोन मुली आहेत. एकीचें नांव सिद्धि, दुसरीचें नांव बुद्धि. पार्वतीनें विश्वरूपाकडे त्या मुलींना मागणी घातली. गणेशासारखा सकलविघ्नहर्ता आणि विद्यावाचस्पति असा जांवई मिळतो; शिवाय शंकर-

पार्वतींच्याकडे सोरगत जमते हें पाहून विश्वरूपाला आनंद आणि अभिमानहि वाटला. त्यानें तात्काळ वाङ्‌निश्चय करून ‘प्रदास्यामि’ म्हणजे कन्या देतों असं त्रिवार म्हटलें.

मग एका सुमुहूर्तावर सिद्धि आणि बुद्धि या दोघींनीं गणेशाच्या गळ्यांत माळ घातली. लग्नसमारंभ थाटाचा झाला. पार्वतीला एकीऐवजीं दोन सुना मिळाल्या. कैलासावर शिवाच्या संसारांत त्यांचा पायरव सुरू झाला. त्या दोघी सिद्धि–बुद्धि शिवपार्वतीच्या सेवेंत स्वतःला धन्य मानूं लागल्या. गणपति हा तर त्यांचें सर्वस्वच! प्रेम आणि सेवा या दोन गुणांनीं त्या दोघींनीं गजाननाला जिंकलें. सिद्धीपासून त्याला क्षेम नांवाचा मुलगा झाला आणि बुद्धीपासून लाभ नांवाचा मुलगा झाला. हीं दोन पुत्ररत्नें शिवपार्वतींच्या मनाला संतोष देऊं लागलीं. ते दोघे दोन मांड्यांवर येऊन बसले, कीं गजाननालाहि आपला गृहस्थाश्रम धन्य वाटूं लागे.

कैलासावर एवढ्या सगळ्या घटना घडल्या आणि मग कुठें षडाननाची पृथ्वीप्रदक्षिणा पुरी झाली. तो कैलास पर्वताची चढण चढत असतांना मनांत म्हणत होता. ‘गजानन अजून प्रदक्षिणेच्या अर्ध्या वाटेंतसुद्धा पोंचला नसेल. तो परत येईपर्यंत आपलें लग्नच काय; पण मुलेंबाळेंसुद्धा होऊन कैलासावर खेळायला लागतील.’ या मनोराज्यांत निमग्न होऊन हर्षयुक्त अंतःकरणानें वर चढत असतां त्याला अन्य कशाचेंहि भान नव्हतें. तो आपल्याच रंगांत रंगला होता. समोरून नारदमुनींची स्वारी कैलास उतरून खालीं येत आहे हेंसुद्धा त्याला दिसलें नाहीं. ‘नाराऽऽऽयण’ असा नामोच्चार जेव्हां नारदानें उंच स्वरांत केला, तेव्हां कुठें षडाननाचें लक्ष त्याच्याकडे गेलें. मग तो भानावर येऊन म्हणाला.

“नमस्कार नारदमुने!”

“नाराऽऽयण!”

“कुठें गेली होती स्वारी?”

" गेलों होतों कैलासावर. सगळयांचं दर्शन झालं. तूं तेवढा चुकला होतास. "

" अहो मीच कशाला ? गजाननसुद्धा चुकला असेल. कारण आम्ही दोघे पृथ्वीप्रदक्षिणेला निघालों होतों. जो प्रथम ती पुरी करील त्याचं लग्न प्रथम व्हायचं असा नेम ठरला होता. मी हा आत्तांच प्रदक्षिणा संपवून परत येतों आहें. गजानन किती मागं रेंगाळला असेल तें तोच जाणे ! अंगानें स्थूल अन् निघाला माझ्याबरोबर स्पर्धा करायला — "

त्यावर नारदमुनि खो खो हसूं लागले. जरा थांबायच, एकवार नारायण म्हणायचें आणि पुन्हा हसायचें असा प्रकार सुरू झाला. कार्तिकेयाला तें चमत्कारिक वाटलें. तो त्रासिकपणें म्हणाला.

" अहो, हसतां काय असे ? "

" अरे बाबा, हसूं नको तर काय करूं ? तुला वाटतं कीं गणपति अर्ध्या वाटेंत रेंगाळतो आहे. भ्रम आहे तुझा हा. त्याचं लग्न झालं. एक सोडून दोन स्त्रिया त्यानें वरल्या. त्याला दोन मुलगेपण झाले आहेत. आणि ते आपल्या बालक्रीडांनीं कैलास डोक्यावर घेत आहेत. एकाचं नांव आहे क्षेम आणि दुसऱ्याचं नांव आहे लाभ — गजानन नुसता आनंदानें फुलून गेला आहे. "

" अहो, सांगतां काय तुम्ही ? "

" खरं तेंच सांगतों. या रसवंतीला असत्याचा विटाळ कधींहि झालेला नाहीं. "

" त्यानें पृथ्वीप्रदक्षिणा पूर्ण केली ? "

" हो केली. एका घटकेंत केली. "

" ती कशी काय ? "

" बाबारे, कुऱ्हाडीनें काम होत नाहीं तें कित्येकदा सुईनें होतं.

गजानन मोठा चतुर पुरुष. त्यानें आईबापांची पूजा केली, त्यांनाच प्रदक्षिणा केली आणि म्हटलं, 'झाली माझी पृथ्वीप्रदक्षिणा. शास्त्रवचन प्रमाण.' शंकरानें ती गोष्ट मान्य केली."



षडाननाला नारद भेटतो

बिचारा कार्तिकेय! त्याला या गोष्टीचं फार वाईट वाटलें. तो म्हणाला कीं आईबापांनीं गजाननाविषयीं पक्षपात केला. तो त्यांचा आवडता अन् मी नावडता. कशाला जायचें आतां त्यांच्याकडे? आतां मला कैलास काय अन् दुसरा कोणता तरी डोंगर काय; दोन्ही सारखेच......

तो त्याच पावलीं मागें फिरला. नारदालाहि वाटलें कीं आपल्यालाहि मागें फिरायला हवें. नारद परत कैलासावर आला. त्यानें शिवपार्वतींना षडानन भेटल्याचें आणि रुसून कुठें तरी निघून गेल्याचें वर्तमान सांगितलें. शिवाला दुःख झालें. पार्वतीचें हृदय व्याकुळ झालें. गजाननालाहि खेद झाल्यावांचून राहिला नाहीं. सर्वांनीं मिळून नारदाला सांगितलें कीं, तुम्ही त्याचा शोध करा अन् समजूत घालून त्याला परत घेऊन या. म्हणावें कीं 'आम्हीं तुझ्या वाटेला डोळे लावून बसलों आहों.'

नारदानें ती आज्ञा मान्य केली. तो षडाननाचा शोध करीत करीत पृथ्वीतलावर हिंडूं लागला. त्यान अनेक पुरेंपट्टणें, नद्या, सरोवरें, वनें दांगें, धांडोळलीं. पण षडाननाचा कुठेंच पत्ता लागेना. शेवटीं क्रौंच पर्वतावर नारदाला त्याची भेट झाली. नारदानें त्याला शिवपार्वतींचा निरोप सांगितला. नाना प्रकार त्याचें सांत्वन केलें. पण षडाननाचा रुसवा जाईना. नारदाचं कोणतेंहि वचन तो मानीना. त्याचें आपलं एकच पालुपद—

" मी कैलासावर येणार नाहीं ! "

नारदाला निराश होऊन परत यावें लागलें. मुलाचा रुसवा जात नाहीं हे पाहून पार्वतीच चित्त व्यथित झालें. ती शिवाला समागम घेऊन मुलाचा मागोवा घेत घेत क्रौंच पर्वतावर आली. आई-वडील येत आहेत हें षडाननानें दुरून पाहिल आणि तीं त्याच्या आश्रमाजवळ पोंचायच्या पूर्वींच दुसऱ्या पालथणानें पर्वत उतरून पलायन केलें. तिथून तीन योजनें दूर जाऊन त्यानें एका अरण्यांत आपली मठी उभारली. इतके श्रम सोसूनाहि पार्वतीला पुत्राचें दर्शन लाभलं नाहीं.

क्रौंच पर्वतावर शंकर जो प्रकट झाला तो ज्योतिर्लिंगाच्या स्वरूपांतच दिसला. त्या दिवसापासून तें स्थान मल्लिकार्जुन या नांवानें प्रसिद्ध झालें. एक महान् शिवक्षेत्र बनून राहिलें.

शिवशंकर अद्यापहि त्या ठिकाणीं वास्तव्य करून राहिला आहे आणि आपल्या पुत्राची वाट पहात आहे. तो कधीं येईल अन् कधीं शिवपार्वतीला भेटेल तें कोण सांगणार !

---

# घृष्णेश्वर

धुश्मेश्वर, घुसृणेश्वर किंवा घृष्णेश्वर हीं एकाच ज्योतिर्लिंगाचीं तीन नांवें आहेत. हे ज्योतिर्लिंग निजामराज्यांत औरंगाबादेपासून अठरा मैलांच्या अंतरावर आहे. वाटेंत देवगिरी अथवा दौलताबाद नांवाचा एक किल्ला लागतो. या किल्ल्यावर एकनाथमहाराजांचे गुरु श्रीजनार्दनमहाराज यांची समाधि आहे. वेरूळला जाणारा रस्ता तिथूनच पुढें जातो. वेरूळ हे लेण्यांचे ठिकाण. इथलें कैलास लेणें कारागिरी आणि मूर्तिकला या दोन्ही दृष्टींनी अप्रतिम सुंदर आहे. तिथूनच खाली उतरून घृष्णेश्वराच्या मंदिराकडे जायचें.

हें मंदिर मुळांत कृष्ण राजानें बांधलें आणि पुढें अहिल्याबाईनें त्याचा जीर्णोद्धार केला. देऊळ दगडी बांधणीचें, ठेंगणें ठुसके ; पण रुबाबदार आहे. जवळच धर्मशाळाहि आहे. तिथून थोड्या अंतरावर ग्रामवस्तीत शिवालय नांवाचा तलाव आहे. तो चोहों बाजूंनी खोलवर बांधून काढलेला असल्यामुळें फार सुंदर दिसतो. शिवरात्रीच्या दिवशीं घृष्णेश्वराची उत्सवमूर्ति पालखींत बसून वाजत-गाजत इथें स्नानाला येते. हा तलावहि अहिल्याबाईनेंच बांधला आहे. तलावांतलें पाणी पाताळींच्या भोगावतीचें आहे आणि ते सदाशिवानें पार्वतीची तृषा हरण करण्यासाठीं भूमींत त्रिशूळ खुपसून वर आणलें अशी कथा आहे.



घृष्णेश्वर मंदिर

या वनाला पुराणांतरीं काम्यवन म्हटलें आहे. शिवाचें ज्योतिर्लिंग या ठिकाणीं प्रकट झालें आणि त्यामुळें या स्थानाचें महत्त्व वाढलें. तीच कथा पुढें दिली आहे

* * *

महाराष्ट्र देश आहे. त्यांत देवगिरि नांवाचा एक पर्वत आहे. त्यावर गगनचुंबी वृक्ष नाहींत; पण तुरळक झाडी मात्र सर्वत्र आहे. फांदीला फांदी भेटत नाहीं. वेलींच्या जाळ्या बनत नाहीत. वाऱ्याला अडथळा होत नाहीं. वाघांना रहायला जागा मिळत नाहीं. त्यामुळें गाईवासरें त्यावर मनसोक्त हिंडतात आणि सुखानें चरतात. माणसांनाहि कवळकाठी तिथेंच मिळते. गांवच्या लोकांना देवगिरीचा आश्रय म्हणजे एखाद्या महापुरुषाचा आश्रय वाटतो.

त्याच पर्वतावर एक लहानशी नदी उगम पावते. तिचें नांव इलागंगा. देवगिरि तिला अंगाखांद्यावर बागडूं देतो अन् मग खालीं पाठवतो. त्या डोंगराला त्या एकुलत्या मुलीची अपूर्वाई आहे. डोंगरहि लहानसाच अन् नदीहि लहानशीच. गांवच्या लोकांनाहि तिचें मोठें कातुक. ती खालीं उतरून मैदानांत येते म्हणजे गंगावतरणच होतें असें त्यांना वाटतें. तिचा जीव लहान असल्यामुळें उन्हाळ्यांत ती आटते; पण गांवकऱ्यांचें तिच्याविषयींचें प्रेम मात्र कधींच आटत नाहीं. गांवांतलीं मुलें पाणी असेल तेव्हां पात्रांत डुंबतात अन् नसेल तेव्हां वाळवंटांत खेळतात.

गांव माणसांनी गजबजलेलें आहे. धनधान्यानें समृद्ध आहे. हव्यकव्यें चालत आहेत. सण-उत्सव हौसेनें साजरे होत आहेत. सुधर्मा ब्राह्मणाच्या घरींहि कशाची कमतरता नाहीं. सुदेहा त्याची भार्या. ती कर्तव्यदक्ष आहे. सुग्रण आहे. पतीविषयीं तिला अत्यंत आदर आहे. सुधर्म्यालाहि तिच्याविषयीं अभिमान आहे. दोघांचा संसार कसा टुमटुमीत चालतो.

सुधर्मा ज्योतिषी आहे. ज्योतिष्याच्या अन् वैद्याच्या घरीं पैसा काय;

रोजचाच. नेहमीं आवक चालू असायची. तो कोणाचें भविष्य सांगायचा. कोणाला दानें सांगायचा. कोणाला जप सांगायचा. ओसरीवर पृच्छकांची नेहमींच गर्दी. कित्येक लोक फराळाला असायचे. कित्येक लोक भोजनाला यायचे. सुदेहेलाहि त्यामुळें घरांत उसंत मिळायची नाहीं. त्यानें मिळवायचें, तिनें सांभाळायचें.

असा होता त्यांचा गृहस्थाश्रम !

पण घरांत घरचीं अशीं माणसें फक्त दोन. सुधर्मा आणि सुदेहा. नवरा अन् बायको. तिसरें कोणीहि नाहीं. तें यावें अशी त्यांची अपेक्षा होती. एखादा मुलगा ; निदान मुलगी तरी. पण लग्न होऊन वर्षेच्या वर्षें लोटलीं तरी अपत्याचा पत्ता नाहीं. व्रतें झालीं, नवस झाले, सायास झाले. सुदेहेला जेवढें म्हणून कांहीं करतां येईल तेवढें सगळें तिनें केलें. स्वतःच्या मनानें केलें अन् जाणत्या लोकांच्या सांगीवरूनहि केलें. पण दैव कांहीं अनुकूल होईना.

तिला वाटे ; आपला नवरा शेंकडों लोकांच्या जन्मपत्रिका पहातो, त्यांचीं भविष्यें सांगतो, कांहीं आडमेळीं असलीं तर दैवी उपाय सांगतो, मंत्रतंत्राचीं विधानें सांगतो अन् आपल्याच बाबतींत त्यानें असें उदासीन कां असावें? घरच्या रोग्याला तपासून औषध कां देऊं नये? मला मुलगा झाला तर तो त्याचाच वंश चालवणार ना? मग मीं तेवढें कष्टी व्हावें अन् नवऱ्याला त्याचें कांहींच वाटूं नये, ही काय बरी गोष्ट आहे?

मग एक दिवस तिनें सुधर्म्याजवळ हट्टच धरला कीं, 'माझी पत्रिका पहा अन् मुलाबद्दल काय तें सांगा.' सुधर्मा ब्राह्मणानें तिची पत्रिका उलगडली. सगळे ग्रह, त्यांचीं स्थानें, संततिस्थानाशीं त्यांचे होणारे योग, त्यांचें बलाबल, या सर्व गोष्टींचें बारकाईनें निरीक्षण केलें. तो पत्रिकेकडे नजर लावून बसला होता अन् ती त्याच्या चेहऱ्याकडे टक लावून बसली होती. बऱ्याच वेळानंतर सुधर्म्यानें मान वर केली अन् निरुत्साही शब्दांत तिला म्हटलें.

" सुदेहे! तुझा आटापिटा व्यर्थ आहे. आशा फोल आहे. तुझ्या कुंडलींत मुलाचा योग नाही. अगदीं साफ नाहीं. तुझें वांझपण जन्माचें."



सुधर्मा पत्रिका पहातो

सुदेहा एकदम उठून घरांत गेली. तिला तो निराशेचा धक्का सहन झाला नाहीं. रडून रडून तिनें पदर भिजवला. तिला वाटलें, मूल नाहीं तें घर ओसाड! एवढा भरलेला संसार आहे; पण करायचा काय तो! रांगतें खेळतें असल्यावांचून संसाराचें कसलें आकर्षण! आपल्याला मूल नाहीं म्हणजे आपल्या नवऱ्यालाहि नाहीं. आपल्यामुळें, आपल्या दुर्भागीपणामुळें त्यांचा वंशछेद होणार......

सुदेहेनें कित्येक दिवस याच एका गोष्टीवर विचार केला. मग ती निर्णयावर आली. तिनें एक दिवस नवऱ्याला म्हटलें.

" माझ्यामुळें तुम्हांला निपुत्रिकपणाचा कलंक लागणार. तुम्हांला परलोक मिळायचा नाहीं. तुमच्या पितरांना अधोगति भोगावी लागेल."

" मग काय करायचें त्या गोष्टीला ! नशिबाला उपाय नाहीं म्हणायचें, स्वस्थ बसायचें."

" उपाय आहे. माझें नशीब फुटकें असलें तरी तुमचें असायचें कारण नाहीं. तुम्ही दुसरें लग्न करा."

" दुसर लग्न ? "

" होय. एवढें चपापायचें कारण नाहीं. कसेंहि करून माझ्या घरांत मूल खेळायला हवें."

" पण मला मुलगी कोण देणार ? "

" कां ? कोणीहि देईल. सर्वांच्या आधीं माझे वडील देतील."

" अग, त्यांनीं तर दिलीच आहे कीं."

" एक दिली आहे तशी दुसरीहि देतील. माझी धाकटी बहीण घुश्मा. तुम्हीं पाहिलीच आहे. ती तुम्हांला द्यायला सांगतें."

" म्हणजे छान. बहिणी बहिणी अन् सवती सवती—"

" त्या सवती होणार नाहींत. सख्ख्या बहिणीच राहतील. जन्मवेरी. शेवटपर्यंत."

" कठिण आहे."

" कठिण नाहीं. घुश्मा माझी धाकटी बहीण. तिच्यावर माझें जिवापाड प्रेम आहे. तिच्याविषयीं माझ्या मनांत कसलेंहि किल्मिष येणार नाहीं. आम्ही घर चालवूं, तुमची सेवा करूं अन् मानेवर मान टाकून राहूं. माझ्या आयुष्यांत माझी अशी कांहीं महत्त्वाकांक्षा आतां उरली नाहीं. यापुढें तुम्हां दोघांच्या सुखांत, वभवांत, कल्याणांत मी माझें सर्वस्व पाहीन. तुम्ही निश्चिंत असा..."

आणि मग थोड्याच दिवसांत सुधर्मा ब्राह्मणाचें दुसरें लग्न झालें.

सुदेहेची बहीण घुश्मा त्या घरांत धाकटी मालकीण म्हणून प्रविष्ट झाली. सुदेहेनें म्हणजे तिच्या आक्कानें तिचें खूप खूप कौतुक केलें

आपले सगळे दागिने तिला घातले आणि नवेहि करविले. आपलीं सगळीं उंची वस्त्रें तिला नेसवलीं आणि नवीहि घेतलीं. आपल्या आधीं तिची वेणी-फणी करायची. आपल्या आधीं तिला न्हायला घालायचें. चांगले चांगले पदार्थ आपल्या हातानें करून तिला आधीं खाऊं घालायचे. कामधाम सगळें आपण निपटायचें अन् तिला म्हणायचें, ' तूं बस झोपाळ्यावर. ' माहेरीं आई होती तशी सासरीं आक्का झाली. तिला जणुं सासर हें दुसर माहेरच झालें. बहिणीची माया अन् तत्परता पाहून तिला लाजल्यासारखें व्हायचें. ती अनेकदा म्हणायची, ' आक्का ! माझीं कौतुकं किती करशील गऽऽ!'

घुश्मा सुंदर होती तशीच सौम्य होती. तरुण होती तशीच सात्त्विक होती. निरोगी होती तशीच निर्धारी होती.

घुश्मेच अंतःकरण भक्तिमय होतें. शिव तिचें उपास्य दैवत. लहानपणापासूनच तिला शिवाची आवड जडली होती. ती रोज एकशेंएक शिवाचीं पार्थिव लिंगें करी, त्यांची षोडशोपचारें पूजा करी, मग गांवांतल्या तळ्यांत त्यांचें विसर्जन करी आणि त्यानंतरच अन्नपाणी घेई. शिवरूप समजूनच ती आपल्या पतीची सेवा करी. शिवमूर्ति म्हणूनच आपल्या आक्कावर प्रेम करी. आणि सर्वांभूतीं शिवाचाच वास आहे अशा भावनेनें सर्वांशीं प्रेमानें आणि सौजन्यानें वागे. त्यामुळेंच घुश्मा त्या घरांत सर्वांची आवडती बनली. तिच्या भाग्यानेंच त्या घराची भरभराट झाली.



घुश्मेची पार्थिव पूजा

थोड्याच दिवसांत घुश्मेला गर्भ राहिला. सुदेहा ज्या एका घटनेची वाट पहात होती, ती घटना घडली. तिचा आनंद हृद्यांत आणि घरांतहि मावेनासा झाला. घुश्मेला ती प्राणांपलीकडे जपूं लागली. तिनें घुश्मेची

पांचव्या महिन्यांत ओटी भरली. आठव्या महिन्यांत आठांगळें केलें. नवव्या महिन्यांत प्रसूतिगृह सज्ज करून ठेवलें. अन् मग ती घुश्मेच्या प्रसूतीचा क्षण केव्हां येतो, त्याची वाट पहात राहिली.

योग्य वेळीं शुभतिथि, शुभ नक्षत्र यांवर घुश्मा प्रसूत झाली. मुलगा का मुलगी असा संशय सर्वांच्याच मनांत होता. पण झाला तो मुलगाच झाला. सुलक्षणी, सुंदर अन् गोजिरवाणा. मग जातकर्म, नामकरण वगैरे त्याचे संस्कार मोठ्या समारंभानें झाले. वंशाला अंकुर फुटला. कुळाला कुलदीपक लाभला. सुन्या घरांत त्या बालकानें आनंदाची पेठ उघडली. मग त्याच्या बाळकौतुकांना काय उणें !

सुधर्मा ब्राह्मणाला मुलगा जीवप्राण झाला. वंश वाढवणारी घुश्मा परम प्रिय झाली. सर्वांचें लक्ष रांगत्या, खेळत्या मुलाकडे केंद्रित झालें. सुदेहा घरांतली कर्तीसवरती खरी ; पण सुधर्मा तिच्याकडे दुर्लक्ष करूं लागला. येणारीं जाणारीं माणसेंहि सुधर्मा आणि घुश्मा यांनाच मान देऊं लागलीं. सुदेहेनें घरांत राबावें, सर्व प्रकारचे कष्ट उपसावे आणि एकलकोंडेंच रहावें. या घरांतला आपला मान आतां संपला असें तिला वाटूं लागलें आणि ती अंतरांत कुढूं लागली.

घुश्मा तिचा कधींहि अवमान करीत नसे. तिच्या वृत्तींत काडीमात्र फरक झाला नव्हता. प्रत्येक गोष्टींत आक्का, आक्का, म्हणून सुदेहेचें मत घेत असे. सुदेहा कुठें तरी जाऊन खिन्नपणें बसली कीं घुश्मा तिचा खेद दूर करण्याचा मनापासून प्रयत्न करीत असे. पण सुदेहेला वाटे कीं, हा सगळा मानभावीपणा आहे. मीं घरांतला राब उपसावा म्हणून ही खुशामत आहे.

घुश्मेचा मुलगा जर सुदेहेवर प्रेम करता, आई, आई म्हणून तिला बिलगता, तर सुदेहा अशी रुष्ट झाली नसती. पण त्या बाबतींतहि ती दुर्दैवी ठरली. घुश्मेला मुलगा झाला तेव्हां ती तो आपल्यालाच झाला असें समजली होती. त्याच्या बाळकौतुकाचे सगळे अधिकार तिनें

आपणाकडेच घेतले होते. पण तो मुलगा असा कांहीं चमत्कारिक निघाला कीं, त्याला सुदेहेचें कांहींच पटेना अन् रुचेना. तिचा स्पर्श त्याला कुसुरकिड्याच्या स्पर्शासारखा वाटायचा कीं काय न कळे !

तिनें हात लावला कीं तो किंचाळायचा. ती दहीभाताची ताटली घेऊन जवळ बसली कीं याच्या तोंडाला कुलूप. ती न्हाऊं घालायला निघाली की तो तिच्या हातून आठळीसारखा निसटायचा. तिनें कुशींत घ्यायचा प्रयत्न केला की लाथा मारायचा, तिला दूर ढकलायचा. ती कौतुकाचा शब्द बोलायला गेली, कीं जीभ काढून तिला वेडवायचा. घुश्मा त्याला दटावी, रागें भरे, मारी, सुदेहेला नमस्कार घालायला लावी ; पण तें सगळें मुलाच्या पालथ्या घड्यावर पाणी ! सुदेहेविषयीं त्याच्या मनानें अढी धरली ती कायमचीच. जणूं तो तिचा जन्मजन्मांतरीचा वैरी होता.

त्यामुळें सुदेहेची त्याच्याविषयींची माया हळूहळू आटूं लागली आणि तिची जागा द्वेषानें घेतली. मोठा होतां होतां तो तिला दुरुत्तरं करूं लागला आणि सुदेहा त्याच्यावर बोटें मोडूं लागली. कधी कधीं त्यां दोघांचीं भांडणेंहि जुंपूं लागलीं. सुधर्मा ब्राह्मण मुलाचा पक्ष घेऊन सुदेहेवर डाफरूं लागला. घरांतली शांति पळाली आणि तिच्या जागीं धुसफुस, कचकच येऊन बसली.

या सगळयांपासून नामानिराळी होती ती घुश्मा. कमलपत्र जसें तळयांत राहूनहि कोरडें असावें, तशी ती संसारांत असूनहि संसारापासून अलिप्त होती. घरांतलीं द्वंद्वें तिला दिसत नव्हतीं असें नाहीं. पण ती त्या सर्व गोष्टींकडे शिवशंकराची लीला या भावनेनें पाही. तिची पार्थिव लिंगपूजा नेमानें चालली होती. एकशें-एक लिंगें करायचीं, तीं पुजायचीं अन् तळयांत नेऊन विसर्जित करायचीं. यांत तिचा सकाळचा वेळ जात असे. दुपारीं देवळांत जाऊन ती शिवाच्या कथा ऐकत बसे. नामजप, स्तोत्रपाठ, हें तर खातां-जेवतां, बसतां-उठतां. शिवभक्तींत ती खूप पुढें गेली. मुख्य म्हणजे ईर्ष्या, द्वेष, स्वार्थ, अहंकार, हे मनाचे दोष तिनें

साफ धुऊन टाकले. ती सर्वांची होता ; पण कुठेंहि अडकलेली नव्हती. अन् त्यामुळेंच सर्वकाळ सुखी होती.

घुश्मेनें आपल्या अक्कालाहि शिवभक्तीच्या मार्गांत ओढण्याचा खूप प्रयत्न केला. पण सुदेहा कधीं तिकडे वळलीच नाहीं. मुलाकडून, नवऱ्याकडून अपमानित होऊनहि ती संसारांत अधिकाधिक गुरफटूं लागली. 'माझें माझं' म्हणून प्रत्येक वस्तूला कवटाळूं लागली. तिचा मूळचा प्रेमळपणा नाहींसा होऊन त्या जागीं ईर्ष्या, द्वेष, मत्सर यांनीं तिच्या काळजांत वाडे बांधले. एक सज्जन, प्रेमळ स्त्री पार बिघडून गेली.

सुधर्मा ब्राह्मणाचा मुलगा आतां मोठा झाला. तो विद्या शिकला. बापाला संसारांत मदत करूं लागला. पुढें आईबापांनीं एक सुंदर, सुलक्षणी मुलगी पाहून त्याचें लग्न केल. घरांत आणखी एक नवें माणूस आलें. 'वाढ सुने घरासारखी' अशी म्हणच आहे मुळीं. सावत्र सासूला घरांत विशेषसा मान नाहीं हें पाहिल्यावर सूनहि सुदेहेशीं तुसडेपणेंच वागूं लागली. सुदेहेला बोलतां येईना, चालतां येईना. आतां तर सगळा कारभार मुलाच्याच हातांत आला होता. तोच 'कर्तुम् अकर्तुम्' समर्थ झाला होता.

त्याचें एकंदर वर्तन पाहून सुदेहेला वाटूं लागलें कीं, यापुढें आपली इथें घडगत नाहीं. नवरा आहे तोंवर कसे तरी दिवस जातील; पण पुढें कठीण आहे. हा पोरगा आपल्याला एका वस्त्रानिशीं बाहेर काढील. दारोदार भीक मागायला लावील. एवढें मोठें घरदार आहे, धनदौलत आहे; पण आपल्याला मात्र वृद्धपणीं वणवणत रस्त्यावर पडून मरावें लागेल.

आणि या विचारासरशीं तिच्या हृदयांत सूडाची ज्वाळ उठली. तिच्या सर्व भावना विषमय बनल्या. ज्या मुलासाठीं तिनें नवऱ्याला दुसरें लग्न करायला लावलें, जो जन्माला येतांच तिला स्वर्ग ठेंगणा झाला, तीच सुदेहा आतां त्याची हत्या कुठें आणि कशा प्रकारें करतां येईल या भयंकर विचारांत व्यग्र राहूं लागली. या पोराला जगांतून नाहींसा करायचा ही

गोष्ट तिनें पक्की ठरवून टाकली आणि ती तशा संधीची वाट पहात राहिली. केवळ द्वेषामुळें एका कोवळ्या मनाच्या स्त्रीचें कृत्येंत रूपांतर झालें.



सुदेहा मुलाची हत्या करते

तिला हवी तशी संधि लवकरच मिळाली. घरांतलीं माणसें कुठें तरी आजूबाजूला झालीं होतीं. घुश्मा आपल्या भजनपूजनांत दंग होती. बाहेर रात्रीचा भयाण काळोख पसरला होता. कसल्या तरी विशेष कामामुळें दिवसभर दमलेला तो मुलगा पलंगावर पडल्या पडल्या गाढ झोंपीं गेला होता. आपली सावत्र आई दबत्या पावलांनीं श्वास रोधून अन् पाजळतें खड्ग हातीं घेऊन शयनगृहांत शिरत आहे, हें त्याला झोंपेमुळें कळलें नाहीं अन् पुढें तर एकाच जबरदस्त घावांत सगळेंच थंड झालें.

आपल्या काळजांत सलणारा कांटा अशा रीतीनें तिनें उपटून काढला. पण एवढ्यानें तिचें काम पूर्ण झालें नव्हतें. केलेलें कर्म निस्तरणें भाग होतें. आपल्यावर बिरमत फुटणार नाहीं अशी कांहीं तरी व्यवस्था बेमालूम करून टाकायला हवी होती. त्या बाईला कुठून एवढें बळ अन् धैर्य आलें नकळे! तिनें तो मृत देह उचलून खांद्यावर टाकला आणि ती दबत, छपत त्या अंधारांतून बाहेर निघाली. सरळ गेली ती गांवाच्या मध्यभागीं असलेल्या त्या तळयाकडे. घुश्मा रोज सकाळीं जिथें उभी राहून आपलीं पार्थिव लिंगें तळयांत सोडी, त्याच ठिकाणीं उभी राहून सुदेहेनें तो मृत पुत्र त्या तळयांत टाकला.

धप्पदिशीं आवाज झाला अन् तळयांतलें पाणी वर उडाल त सुदेहेच्या तोंडापर्यंत. सुदेहा त्यासरशीं दचकली. तिथून लगेच माघारी वळली. परत येतांना आपल्याच सावलीला आपण भिऊं लागली. कोणी येईल, पाहील पकडील, या भयानें तिचें काळीज धडधड उडूं लागलें. घरीं परत येऊन तिनें आपल्या अंथरुणावर आंग टाकलें. ती मनांत म्हणाली कीं 'सुटलें!'

पण ती खरोखरच सुटली होती का? कशी सुटेल? जगानें पाहिलें नाहीं म्हणून काय झालें! शंकराचा तिसरा डोळा उघडा होता ना. सकाळ होतांच पहिल्या प्रथम त्या मुलाच्या बायकोनें हाक फोडली. ती खोलींत जाऊन पाहते तर नवरा अंथरुणावर नाहीं अन् चादर रक्तानें भरलेली. सगळया घरांत एकच हलकल्लोळ उठला. रडारड सुरू झाली. त्यांत सुदेहेनेंहि भाग घेतला. इतरांपेक्षां अधिक मोठ्यानें गळा काढून तिनें आपलें निरपराधीपण सिद्ध केलें.

या सगळया गोंधळांत आणि आक्रोशांत सामील नव्हती ती घुश्मा मात्र. सूर्योदयापूर्वीं स्नान करून ती पार्थिवपूजेंत निमग्न झाली होती. बाह्य जग तिनें आपल्या वांट्याला शून्य करून टाकलें होतें. ती सगळया

घडलेल्या अन् घडणाऱ्या गोष्टींचा विचार करणार होती ; पण तो पार्थिव लिंगांचें विसर्जन झाल्यावर.

तिला कळलें कीं, आपला एकुलता एक पुत्र कालवश झाला आहे. कोणीं तरी त्याची हत्या केली आहे. पण कोणीं ? कशासाठीं ? ... ती म्हणाली, या सर्व गोष्टींचा विचार करायला माझा स्वामी समर्थ आहे. कर्ता करविता तो !

घुश्मा लिंगविसर्जन करण्यासाठीं तळयाकडे निघाली. धीर, गंभीर अंतःकरणानें. तिचें पडणारें प्रत्येक पाऊल सांगत होतें कीं, तिची शिवावर दृढ, अतूट श्रद्धा आहे. तिच्यामागून घरचीं, शेजारचीं, रस्त्यावरचीं माणसेंहि निघालीं. त्यांना भीति वाटली कीं, न जाणो ; ही बाई शोकाचा आघात असह्य होऊन जीवबीव देईल तर ! सर्वांच्या बरोबर सुदेहेला पण यावें लागलें.

घुश्मा तळयावर आली. कांठावर नित्याच्या जागीं उभी राहिली. ‘ नमः शिवाय ’ म्हणून तिनें हातांतलीं पार्थिव लिंगें तळयांत सोडलीं. त्यासरशी चमत्कार झाला. तळयाचें पाणी खळबळलें. बुडबुडे, भोंवरे, तरंग उठले आणि त्यांतूनच घुश्मेचा तो मृत पुत्र सजीव होऊन वर आला.

सर्वांचे डोळे विस्फारले. मुद्रा चाकित झाल्या. वाणी मूक झाली. मुलानें वर येऊन आईच्या गळयाला मिठी घातली. मुलगा गेला म्हणून घुश्मा रडली नव्हती. आला म्हणून ती हर्षानें फुलली नाहीं. ती दोन्ही प्रसंगीं आपल्या भक्तीच्या आधारावर अविचल होती. शिवशंकराला वाटलें कीं, घुश्मेच्या भक्तीची आज पराकाष्ठा झाली. आतां तिला दर्शन देऊन कृतार्थ केलेंच पाहिजे. .

आणि पाठोपाठ त्याच तळयांतून ढवळा भोळा शंकर प्रसन्न हास्य करीत वर आला. समोर उभा रहातांच घुश्मेनें त्याच्यापुढें लोटांगण घातलें. आतां मात्र तिचा कंठ दाटला. डोळे प्रेमाश्रूंनीं झरझरूं लागले. ती हात जोडून गद्गद् वाणीनें एवढेंच म्हणाली.

" प्रभो ! तुझी लीला अगाध आहे ! "

" माझी लीला आगाध खरी पण तुझ्या या बहिणीची करणी त्याहून विचित्र आहे. या कृत्येनें तुझ्या मुलाची क्रूर हत्या केली. थांब, तुला वर देण्याच्या आधीं माझ्या या त्रिशूळानें तिचा संहार करतों. "

असें म्हणतां म्हणतां शिवाचे डोळे उग्र झाले. तो जणूं कल्पांतींचा वडवानळ भडकला. सुदेहा उभीच्या उभी विरघळली. सर्व लोकांच्या तोंडचें पाणी पळालें. भ्याली नाहीं, कांपली नाहीं, ती एकटी घुश्मा. तिनें त्या महारुद्राला विनवलें.

" प्रभो, ज्याचें कर्म तो भोगील. तुम्ही तिला शिक्षा करूं नका. तिनें पाप केलें हें मला मान्य. पण तुमचें दर्शन झाल्यावर शिक्षा देण्यासाठीं तरी तें शिल्लक उरेल का ? तुम्ही पतितपावन... तुम्ही दीनोद्धारण... ! "

घुश्मेच्या या उदार भाषणानें शंकर आणखी प्रसन्न झाला. त्यानें म्हटलें,

" घुश्मे, तुझ्यासारखी भक्त तूंच. तुला हवा असेल तो वर माग ! "

त्यावर घुश्मा बोलली.

" मला स्वतःला तुमची कृपा भरपूर आहे. पण माग म्हणतांच तर मागतें. तुम्ही या ठिकाणीं वास करून लोकांचें कल्याण करावें ! "

शिवानें 'तथास्तु' म्हटलें. एका ज्योतिर्लिंगाच्या रूपानें तो तिथें राहिला. लोक त्याला घुश्मेश्वर किंवा घृष्णेश्वर म्हणूं लागले.

---

# कामाख्यापीठ

सती ही दक्षाची कन्या. ती दक्षानें शिवाला दिली होती. पण पुढें शिवाचें आणि दक्षाचें वितुष्ट आलें. दक्षानें यज्ञ केला. त्यांत शिवाला हविर्भाग मिळाला नाहीं. सती त्या यज्ञासाठीं आली होती. तिथें शिवाचा अनादर झालेला पाहून तिनें प्राणत्याग केला. शिवाला ही वार्ता कळली. तो त्या ठिकाणीं आला. सतीचा मृत देह खांद्यावर घेऊन उन्मत्तपणें तांडव करूं लागला. त्याच वेळीं भगवान् नारायणानें आपल्या सुदर्शन चक्राच्या सहाय्यानें सतीच्या शरीराचे एकावन्न तुकडे केले आणि ते अंतराळांत फेकले. ते खंड विखंड जिथें जिथें पडले तिथें तिथें एक एक शक्तिपीठ निर्माण झालें. कामरूप क्षेत्रांत देवीची महामुद्रा पडली, त्यामुळें तिथें कामाख्या पीठ उत्पन्न झालें. सगळ्या भरतखंडात जीं शक्तिपीठें आहेत त्यांत कामाख्या पीठ सर्वश्रेष्ठ मानलें गेलें आहे.



कामाख्या मंदिर

हें स्थान गौहट्टीपासून दोन मैलांवर आहे. ज्या पर्वतावर कामाख्येचें मंदिर आहे त्याला नीलगिरि किंवा नीलकूट म्हणतात. इथलें मुख्य तीर्थ एका अंधाऱ्या गुहेंत आहे. या देवीची पूजा-अर्चा पर्वती गोसाव्यांच्या द्वारा होत असते. या ठिकाणीं येणाऱ्या भक्तांनीं देवीच्या नांवानें कुमारिकांना भोजन घालायचें असतें.

* * *

त्रेतायुगांतली गोष्ट आहे. वराहपुत्र नरक याला कामरूप देशाचें राज्य मिळालें. ज्या वेळीं त्याला राज्याभिषेक झाला त्या वेळी भगवान् नारायणानें त्याला आशीर्वाद देऊन सांगितलें. ‘ या प्रदेशाची प्रधान देवता कामाख्या आहे. आदिशक्तीची ती महामुद्रा आहे. तूं तिला शरण जा. तिची भक्ति कर. म्हणजे तिच्याच कृपेनें तुझें राज्य वाढत्या वैभवानें नांदेल. ’

नरकानें भगवंताचा तो उपदेश मानला. तो कामाख्या देवीला भजूं लागला. त्याचें राज्य निष्कंटक झालें. कुठहि विरोध आणि संघर्ष उरला नाहीं. नरक चैनीला चटावला. पुरता भोगलोलुप बनला. एवढा कालपर्यंत तो देवांचा पक्षपाती होता. देवांचा भक्त होता. पण पुढें बाणासुराची आणि त्याची गांठ पडली. बाणासुर म्हणजे पक्का देवद्रोही. असुर जातींतल एक बडें प्रस्थ. त्यानें नरक बोटचेपा आहे असें पाहिलें आणि त्याच्या मनामध्यें देवद्वेष भरवून दिला. नरक मनुष्य होता तो नरकासुर बनला. त्याच्या अंतरांत आसुरी वृत्ति फोफावली. तो पालक होता तो छलक झाला.

कामाख्या ही इतके दिवस त्याची आराध्य देवता होती. ती त्याच्या भक्तीला भाळली होती. त्याला वारंवार दर्शन देत होती. त्याच्याशीं सुख-संवाद करीत होती. तोहि तिच्या पूजा-अर्चेंत आपल्या ऐश्वर्याचा मुक्त हस्तानें विनियोग करीत होता. पण नंतर त्याची भावना बदलली. कामाख्या म्हणजे तेजाची प्रतिमा आणि सुंदरतेची मूस. नरकासुराला वाटलें कीं, तिला आपली पत्नी करावी. एक दिवस स्पष्ट शब्दांत त्यानें तिला लग्नाची मागणी घातली. देवी चकित झाली. तिची खात्री पटली कीं, नरकासुर पुरता चळला. वस्तुतः तिनें त्याला त्या क्षणीं शापून भस्म करायचें. पण तसें न करतां ती सौम्य शब्दांत त्याला बोलली.

“ नरकासुरा, तुझी मागणी कळली. मी त्या गोष्टीला सिद्ध आहें. पण

माझी एक अट आहे. तूं माझ्या या क्षेत्राचा मार्ग, इथले घाट आणि माझें मंदिर हें सगळें तयार करायला हवेंस आणि तेंहि आजच्या एका रात्रींत. तसें झाल तर मी तुझ्याशीं विवाह करीन. अन्यथा ही गोष्ट शक्य नाहीं. ”

नरकासुर फुरफुरला. ही अट सहज पुरी करतां येईल असें त्याला वाटलें. त्यानें लगेच विश्वकर्म्याला बोलावणें धाडलें. विश्वकर्मा म्हणजे देवांचा शिल्पकार. तो आपल्या कारागिरांच्या तांड्यासह तिथें आला. त्यानें कांहीं लोक घाटाच्या बांधणीसाठीं लावले. कांहीं लोकांना रस्ता बनविण्यासाठीं नेमलें आणि तो स्वत: निवडक लोकांसह मंदिराच्या उभारणीला लागला. घटकेघटकेनें मंदिर वर चढूं लागलें. रात्र संपण्याच्या पूर्वी बहुतेक काम पूर्ण झालें. फक्त कळस तेवढा चढवायचा राहिला. आणि एवढ्यांत कोंबडा आरवला. नरकासुराला देवीची अट पुरी करतां आली नाहीं. त्यामुळें त्याचे पुढचे सगळे बेत ढासळले. कामाख्या देवी तिथें प्रगट होती ती एकाएकीं गुप्त झाली.



**कोंबडा आरवतो ; मंदिर थांबतें**

वसिष्ठ मुनीला ही वार्ता कळली. नरकासुर उन्मत्त झाला आणि त्यानें साक्षात् देवीविषयींहि भलता भाव धरला हें जाणून त्याला क्रोध आला. ‘ आजपासून हें कामाख्या पीठ गुप्त होईल, ’ असा त्यानें शाप दिला. आणि तो शाप खरा व्हायलाहि वेळ लागला नाहीं.

कामाख्या पीठ भूमींत गडप झालें. युगांमागून युगें लोटली. कालचक्रानें अगणित फेरे केले. अनेक राजसत्ता उगवल्या, नांदल्या आणि अस्त पावल्या. माणसांच्या किती तरी पिढ्या महाकालानें आपल्या उदरांत रिचवल्या. कामाख्या-पीठावर मातीचे थरच्या थर चढले. कालप्रवाहाबरोबर लोकांची

त्या स्थळाविषयींची स्मृतिहि अंधुक होऊं लागली. आणि अशा स्थितींत इसवी सनाचें सोळावें शतक उजाडलें.

त्या शतकाच्या प्रारंभीं कामरूप प्रदेशांत म्हणजे आजच्या आसामांत लहान लहान राज्यें खूप होतीं. त्यांच्यांत एकजूट नव्हती; तर संघर्षच होता. प्रत्येक राजाला वाटे कीं, आपण अधिराज व्हावें. सगळा मुलूख आपल्या ताब्यांत यावा. त्यामुळें प्रत्येक राजा सैन्य वाढवी आणि युद्धाची तयारी करी. कोणाची ना कोणाची तरी लढाई चालूच राही. सगळ्या प्रदेशांत धालमेल चालूच असे.

त्यांतच विश्वसिंह नांवाच्या एका राजानें आपलें घोडें पुढें दामटलें. तो स्वतःला महादेवाचा पुत्र समजे. त्यानें बराच सैन्यसंग्रह केला आणि एकेक राज्य आपल्या सत्तेखालीं आणायला प्रारंभ केला. त्यासाठीं त्याला चौफेर लढाया कराव्या लागल्या. अशाच एका लढाईत त्याची अन् सैन्याची चुकामूक झाली. त्याला एकटेंच भटकण्याची वेळ आली.

फिरतां फिरतां तो एका डोंगराच्या पायथ्याशीं आला. त्याला वाटलें कीं, डोंगरमाथ्यावर चढावें अन् तिथून आपल्या सैन्याचा पत्ता लागतो कीं काय, तें पहावें. तो शिखरावर गेला. चढतां चढतां थकला. माथ्यावर एक वडाचें झाड होतें. तें पानांनीं दाटलें होतें. चोफेर पसरलें होतें. त्याच्या कांहीं पारंब्या जमिनींत शिरून मोठ्या झाल्या होत्या अन् कांहीं नुमत्याच लोंबत होत्या.

विश्वसिंह त्यांतल्याच एका मोठ्या पारंबीला टेकून बसला. वाऱ्यानें त्याचा घाम सुकवला. सावलीनें त्याचा ताप शमवला. वटवृक्षाच्या पालवींत नाचत, उडत किलबिलणाऱ्या पाखरांनीं त्याच्या त्रस्त मनाला क्षणभर सुखी केलें. पण त्याला हवें होतें पाणी. तहानेनें त्याच्या घशाला कोरड पडली होती. पण जवळपास कुठें पाण्याचा झरा आहे का नाहीं ह त्याला ठाऊक नव्हतें. सांगायला तिथें कोणी माणूस नव्हतें. विश्वसिंहाला विवंचना पडली कीं आतां काय करावें !

पण त्याचें दैव आज जोरावर होतें. त्याच्या आयुष्यांत आज एक लाभाची महान् पर्वणी आली होती. भाग्यानेंच त्याला नकळत तिथें खेचून आणलें होतें. दैवाचीं पावलें कशीं पडतात, तें माणसाला कळत नाहीं. विश्वसिंहालाहि तें कळलें नव्हतें. करंटा माणूस जगाला विटून र कुठें तरी जाऊन कपाळावर हात ठेवून बसावा आणि अचानक खालच्या भूमींत त्याला गुप्तधन गवसावें, तसेंच आज विश्वसिंह राजाच्या आयुष्यांत घडायचें होतें.



म्हातारी राजाला पाणी देते

आणि याला कारणीभूत कोण झालें तर एक म्हातारी! ती कुठून तिथें आली कोण जाणे; पण निष्कारण मात्र आली नव्हती. तिच्या हातांत फूल-पत्री होती त्या अर्थीं ती कोणाची तरी पूजा करायला आली होती हें नक्की. आपलें काम करायच्या आधीं तिनें राजाची चौकशी केली. तो तहानलेला आहे असें कळतांच त्याला आधीं पाणी आणून दिलें. भुकेल्याला अन्न आणि तहानेल्याला पाणी देणें, ही परमेश्वराची साधी नव्हे, तर महापूजा आहे, हें त्या म्हातारीला कळत होतें.

राजा पाणी पिऊन तृप्त झाला. मग त्यानें म्हातारीची चौकशी केली.

त्या डोंगराच्या परिसरांत कोच जातीचे वन्य लोक रहात होते, त्यांच्यापैकींच ती होती. ‘ डोंगरावर कशाला आलीस ? ’ म्हणून विचारतां ती राजाला म्हणाली.

“ राजा, तूं ज्या वटवृक्षाच्या सावलीला बसला आहेस, त्याच वृक्षाच्या मुळांत एक मातीचा उंचवटा आहे. त्याला देवीची पीठिका म्हणतात. ही देवी कोण हें आम्हांला ठाऊक नाहीं. पण हें स्थान मात्र जागृत आहे. इथें ताबडतोब साक्षात्कार मिळतो. या डोंगराच्या पंचक्रोशींतले लोक याच देवीचे भक्त आहेत. संकटकाळीं ते हिलाच गाऱ्हाणें घालतात. मनकामना पूर्ण व्हावी म्हणून हिलाच नवस करतात. ही देवी त्यांचें संकट निवारते. त्यांच्या नवसाला पावते. ते मग हिची पूजा बांधतात. हिला साडीचोळी अन् सौभाग्य–अलंकार अर्पण करतात. प्रसंगविशेषीं पशूचा बळीहि देतात. राजा, तुझ्यावर कांहीं संकट असेल, तर हिला शरण जा, नवस कर अन् मग चमत्कार पहा... ”

विश्वसिंह राजानें म्हातारीचें बोलणें लक्षपूर्वक ऐकलें. तिच्या शब्दाशब्दांतून जणूं त्या देवीविषयींची श्रद्धा ओसंडत होती. राजालाहि युद्ध जिंकण्याची अन् राज्य वाढवण्याची चिंता होतीच. त्याला वाटलें, देवी जर पावत असेल तर सोन्याहून पिवळें !

मग तो उठला. देवीपुढें गेला. त्यानें देवीला साष्टांग प्रणिपात केला. मग नम्र वाणीनें म्हटलें.

“ देवी जगदंबे, तुझें नांव काय, रूप काय तें मला अगम्य आहे. पण मी भाव धरून तुझ्या पायांशीं आलों आहें. चालू असलेल्या लढाईंत मला जय मिळूं दे. माझें राज्य वाढूं दे. तसं झालें तर मी या ठिकाणीं तुझें सोन्याचें देऊळ बांधीन. ”

मग विश्वसिंह तिथून निघाला. त्याचें सैन्य त्याला मिळालें. मांडलेल्या युद्धांत त्याला विजयश्रीनें माळ घातली. तो मोठ्या प्रदेशाचा मोठा राजा झाला. त्याच्या राज्यांत शांतता आणि सुबत्ता नांदूं लागली. नीलकूट

पर्वतावर वटवृक्षाखालीं असलेल्या देवीचीच ही कृपा, तीच आपल्या नवसाला पावली, असें त्याला वाटलें.

विश्वसिंहानें मग राजपंडितांना पाचारण केलें. त्यांना देवीचा साक्षात्कार सांगून ही देवी कोण त्याचा शोध लावा अशी आज्ञा केली. पंडितांनीं पुराणें धांडोळलीं आणि निर्णय दिला कीं वसिष्ठाच्या शापानें आणि नरकासुराच्या प्रमादानें भूमिगत झालेलें सर्वश्रेष्ठ कामाख्या पीठ तें हेंच.

विश्वसिंहाला आनंद झाला. तो पुनश्च नीलकूट पर्वतावर गेला. त्यानें तिथें कामाख्येचें मंदिर बांधायचें ठरवलें. त्यासाठीं प्रथम तो वटवृक्ष कापून टाकला. मग देवीची पीठिका म्हणून उल्लेखला जाणारा मातीचा तो उंचवटा खणायला प्रारंभ केला. खोदतां खोदतां खालीं मूळचें गुप्त झालेलें मंदिर सांपडलें. पंडितांनीं जो निर्णय दिला होता तो खरा ठरला. विश्वसिंहानें तिथेंच नव्या मंदिराचा पाया घातला. राजा नवस बोलला होता कीं ' तुझें मंदिर सोन्याचें बांधीन '; पण ती गोष्ट वाच्यार्थानें खरी करणें त्याला शक्य नव्हतें. सोन्याच्याच विटा, सोन्याचाच चौथरा, सोन्याचेच खांब, सोन्याचाच कळस म्हणजे सोन्याचा सांठा केवढा प्रचंड हवा असेल त्याची कल्पना करा. रावणाच्या लंकेवर धाड घातली किंवा कुबेरानेंच प्रसन्न होऊन सोन्याचा पाऊस पाडला तरच ही गोष्ट शक्य होती. तेव्हां राजानें एक युक्ति केली. प्रत्येक विटेंत एक एक रति सोनें घालून त्यानें मंदिराची उभारणी केली. आणि अशा रीतीनें त्यानें आपला नवस पुरा केला.

नीलकूट पर्वतावर कामाख्येचें मंदिर विलसूं लागलें. त्याचा सुवर्ण कळस सूर्यप्रकाशांत लखलखूं लागला. नव्यानें स्थापित झालेल्या कामाख्या देवीच्या दर्शनासाठीं कामरूप देशांतली जनता नीलकूटाच्या पायऱ्या चढूं लागली. देवीच्या दर्शनानें स्वतःला कृतार्थ समजूं लागली. कामाख्या पीठ हें लोकयात्रेचें ठिकाण बनलें. सर्वतोपरि त्याचें वैभव आणि माहात्म्य वाढलें.

विश्वसिंहाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र मल्लदेव गादीवर बसला. चिलाराय नांवाचा त्याला एक धाकटा भाऊ होता. मल्लदेवाच्या कारकीर्दीत एक उत्पाती घटना घडली. मूळचा हिंदु पण धर्मांतरानें मुसलमान झालेला आणि त्यामुळेंच ज्ञातिबांधवांनीं तिरस्कारलेला एक पुरुष बलदंड झाला. कालापहाड या नांवानें बंगालच्या इतिहासांत तो प्रसिद्ध आहे. याच कालापहाडची वक्र दृष्टि कामाख्येकडे वळली. त्यानें एक दिवस धाड घालून तिचें मंदिर मोडलें, उध्वस्त केलें. पण इ. स. १५६२ मध्यें मल्लदेवानें पुन्हां बळ बांधलें आणि मोडलेलें मंदिर जसेंच्या तसें उभारलें.

हाच मल्लदेव आणि त्याचा भाऊ चिलाराय या दोघांच्या मूर्ती मंदिरांत कामाख्येसमोर जोडीनें उभ्या असलेल्या आजहि तुम्हांला दिसतील. या मल्लदेवराजानेंहि बापाप्रमाणेंच कामाख्येची भक्ति केली. तिच्या पूजेअर्चेंत कसलेंहि न्यून पडूं दिलें नाहीं. पण अशी एक घटना घडली कीं, त्यामुळें मल्लदेवाला नव्हेच तर त्याच्या पुत्र-पौत्रांनासुद्धा देवीचा क्रोध सहन करावा लागला. प्रकार घडला तो असा—

राजानें केन्दुकलाई नांवाच्या एका ब्राह्मणाला देवीचा पुजारी म्हणून नेमलें होतें. ब्राह्मण भक्तिमान होता, साधक होता. प्रेमळ मनानें आणि जरासुद्धा आळस न करतां तो देवीची त्रिकाळ पूजा करी. उपचार-समर्पणांत तो कसलीहि कसूर करीत नसे. त्यामुळें देवी त्याच्यावर प्रसन्न होती. तो जेव्हां तिची संध्याकाळची आरती करी तेव्हां देवी त्या मूर्तींतून प्रगट होई आणि त्या पुजाऱ्यापुढें घंटेच्या तालावर नृत्य करूं लागे. ब्राह्मणाला त्यामुळें धन्य धन्य वाटे. तें नृत्य पाहून त्याच्या डोळयांचें पारणें फिटे. हें नृत्य पाहण्याचें भाग्य फक्त एकट्या पुजाऱ्यालाच लाभत होतें. ही घटना गुप्त ठेवण्याबद्दल देवीनें त्याला बजावलें होतें.

पण कसें काय झालें कोण जाणे ! ती वार्ता बाहेर फुटली. हळूहळू लोकांत पसरली. शेवटीं राजाच्या कानापर्यंतहि गेली. मल्लदेवाला त्या-बद्दल आश्चर्य तर वाटलेंच, पण उत्सुकताहि वाटली. त्यानें पुजाऱ्याला

बोलावणें धाडलें. पुजारी आला. राजानें त्याला सरळ प्रश्न केला. चांचरत, अडखळत का होईना, पण त्यानें खरी हकीगत राजाला सांगितली. राजा



कामाख्येचें नृत्य

म्हणाला कीं हें नृत्य आपण पाहणार. पण ब्राह्मणानें सांगितलें कीं 'आपल्याला देवीची तशी आज्ञा नाहीं.' राजाला मनांतून तो अपमान वाटला. देवीचें भग्न झालेलें मंदिर आपण उभारलें. तिच्या पूजेअर्चेचा आणि उत्सवाचा खर्च आपल्याच तिजोरींतून होतो. देवीचें वैभव आपणच वाढवतों. आणि तिचें

नृत्य मात्र आपल्याला पहायला मिळूं नये म्हणजे काय गोष्ट आहे? पुजारी म्हणजे आपण नेमलेला एक नोकर. देवीच्या लेखीं माझ्यापेक्षां त्याचीच प्रतिष्ठा अधिक ठरली. छे ! हें नाहीं आपण सहन करणार....

राजाचा हा वृथा अहंकार होता. देवीला राजा रंक दोन्ही समान हें तो जाणत नव्हता. ज्याची भक्ति त्याचा देव. बाकीच्या अवांतर गोष्टी व्यर्थ आहेत. हें त्याला ठाऊक नव्हतें आणि म्हणूनच त्यानें पुजाऱ्याला बजावलें.

" तें कांहीं चालायचें नाहीं. मला देवीचें नृत्य पाहिलेंच पाहिजे. मी आज रात्रीं येणार. मंदिर माझें आहे. तुझी कोणतीहि हरकत मी ऐकून घेणार नाहीं. "

बिचारा पुजारी ! तो घाबरला. त्याला ' इकडे आड, तिकडे विहीर ' असें झालें. एका बाजूनें देवीचा कोप अन् दुसऱ्या बाजूनें राजाचा कोप. दोन्हीहि भयंकर. दोन्हीहि पाळेंमुळें उखडणारे. त्यानें भीत भीत राजाला सांगितलें, कीं ' तुम्ही पहाणारच असाल तर सरळ आंत येऊं नका. बाजूच्या गवाक्षांतून गुपचूपपणें पहा. '

राजानें ती गोष्ट मान्य केली. दिवस केव्हां संपतो याची तो वाट पहात राहिला. सूर्यास्त होतांच त्यानें नीलकूट चढायला प्रारंभ केला. आरतीची घंटा वाजते न वाजते एवढ्यांत मंदिराच्या प्राकारांत पोंचला. सरळ मंदिरांत न येतां पक्षद्वारानें आंत शिरून तो बाजूच्या खिडकीशीं उभा राहिला. एक डोळा बारीक अन् दुसरा मोठा करून त्यानें गाभाऱ्यांत दृष्टि टाकली. धूपाचा घमघमाट आणि आरतीचा दीपत्कार होतांच कामाख्या देवी मूर्तीतून बाहेर निघाली. अप्रतिम, सुंदर असें तिचें रूप होतें. मुखावर कोटिचंद्रांचें तेज विलसत होतें. तिच्या पायांतलीं नूपुरें रुणझुणत होतीं. तिच्या सर्वांगांतून नृत्य जणूं प्रस्फुरत होतें. तिच्या आनंदाची ती वेळ होती. तिच्या कलाविलासाची ती सुवर्णघटिका होती. आणि त्या कलेचा साक्षात्कार घेणांरा एकच भाग्यवंत पुरुष अन् तो म्हंणजे पुजारी ब्राह्मण.

तिनें कासोटा खोचला. पदर बांधला. केशपाश घट्ट केला. एकवार दोन्ही हात ताणले नि जवळ केले. तिची दृष्टि एकदा चौफेर हिंडली. आणि तिला काय दिसलें ? बाहेरून गवाक्षाला लागलेला राजाचा डोळा. तो डोळा नव्हता तर साक्षात् रहस्यभेद होता. आणि तो रहस्यभेद कोणीं केला होता ? ज्याच्यावर तिनें विश्वास टाकला, ज्याला आपला कृपापात्र बनवलें, त्या तिच्या पुजाऱ्यानें.

देवीला भयंकर क्रोध आला. तिच्या डोळयांतून क्रोधाच्या ठिणग्या उडूं लागल्या. सौम्यसुंदर कामाख्या एकाएकीं काली कराली झाली. तिची सगळी आकृतिच भयासुर दिसूं लागली. तिच्या कोपाला पहिला बळी पडला तो त्या पुजाऱ्याचा. त्याचें मस्तक छिन्न झालें. आणि त्यापाठोपाठ मल्लदेव राजाला उद्देशूनहि तिनें शापवाणी उच्चारली.

“ मल्लदेव आणि त्याच्या वंशांतला कोणीहि पुरुष आजपासून माझ्या दर्शनाला येऊं शकणार नाहीं. या राजवंशाला मी कायमची दुर्लभ झालें!”

त्या दिवसापासून त्या वंशांतले राजे कामाख्येकडे पाठ फिरवून बसले. तिच्या पूजेअर्चेचीहि आबाळ सुरू झाली. देवस्थानाची सगळी व्यवस्थाच बिघडून गेली.

पुढें सतराव्या शतकांत आसामांतला हा प्रदेश आहोम राजांच्या सत्ते-खालीं आला. त्यांनीं लवकरच कामाख्येकडे ध्यान दिलें. त्यांनीं शांति-पुराहून एक शाक्तपंथी साधु बोलावून आणला आणि त्याला राजगुरूचे अधिकार बहाल केले. कामाख्यापीठाचीहि सर्व व्यवस्था त्याच्याकडेच सोंपवून दिली. कामाख्येच्या पर्वतावर त्या साधूची स्थापना झाली म्हणून त्या दिवसापासून त्याच्या शिष्य-प्रशिष्यांना ‘ पर्वतीय गोसावी ’ अशी संज्ञा प्राप्त झाली. आजमितीसहि तेच गोसावी कामाख्यापीठाची व्यवस्था चालवीत आहेत.

---

# बल्लाळविनायक

कुलाबा जिल्ह्यांत नागोठण्याजवळ एक गणपतीचें स्थान आहे आणि तें अष्टविनायकांपैकीं एक आहे. या गणपतीला 'बल्लाळ विनायक' असें म्हणतात. देवस्थान रम्य आहे, प्रशस्त आहे. जवळच दोन पुष्करिणी आहेत. सभोंवतीं घरें आहेत. इथली गणपतीची मूर्ति रुंद आणि आकारानें ओबडधोबड अशीच आहे. इथें त्रिकाळ चौघडा झडतो. भाद्रपद आणि माघ या महिन्यांतल्या शुद्ध चतुर्थीस थाटाचे उत्सव होतात.



विनायक म्हणजेच गणपति

रात्रीं महापूजा, आरत्या, छबिना आणि मग महानैवेद्य असा सोहळा असतो. महानैवेद्य दाखवितांना दार लावून घेतात. नंतर पाहिलें असतां, त्यांतल्या वरणभातावर बोटें उमटलेलीं दिसतात. हीं बोटें गजाननाचींच असें भाविक लोक समजतात.

बल्लाळ विनायक मुळांत मुरुड नांवाच्या गांवीं होता. तो एका वैश्य भक्ताबरोबर त्याच्या बैलावरच्या गोणींतून इथें आला अशी दंतकथा आहे. त्याच्याचबरोबर तो घाटमाथ्यावर येणार होता, पण पाली गांवीं मुक्काम पडला असतां त्या वैश्यानें त्याला खालीं ठेवलें आणि तो इथेंच स्थिर झाला असें सांगतात.

* * *

ध्रुव आणि प्रऱ्हाद ही पुराणांतली बालभक्तांची जोडी. दोघांनाहि बाल-पणींच देवाचा छंद लागला. दोघांचाहि छळ झाला. ध्रुवाला त्याच्या सावत्र आईनें छळलें यांत विशेषसें नवल नाहीं. पण प्रऱ्हादाचा खुद्द बापच वैरी झाला. दोघेहि भक्तीची कास धरून राहिले. दोघांनीहि अखेर आपलें ध्येय साध्य केल. दोघेहि देवाचे लाडके बनले.

पण ही बालभक्तांची परंपरा तिथेंच खंडित झाली नाहीं. या परंपरेंत आणखीहि कित्येक भाग्यवंत बालक सामील झाले आहेत. बल्लाळ हाहि त्यांतलाच एक.

पाली हें त्याचें गांव. कल्याण नांवाच्या एका धनाढ्य वाण्याचा तो मुलगा. शरीर गाडस, मुद्रा टवटवीत, डोळे सौम्य. एकदा आपल्या ऐन बालवयांत त्यानें गजाननाची तुंदिल मूर्ति पाहिली आणि त्याच दिवसा-पासून त्याला गणपतीचा छंद लागला. हा देव आपल्याला प्रसन्न झाला पाहिजे, आपल्याशीं बोलला पाहिजे, हसला पाहिजे, हा ध्यास त्याच्या मनानें घेतला.

सकाळीं, दुपारीं, मन मानेल तेव्हां तो गल्लींतल्या आपल्या संवगड्यांना गोळा करा आणि त्यांच्यासमवेत खेळ मांडी. खेळ म्हणजे लपंडाव नव्हे, शिवाशिवी नव्हे, चेंडू-लगोरी नव्हे, कीं दुसरें कांहीं नव्हे. त्याचा खेळ फक्त एकच अन् तो म्हणजे गणपतीची पूजा, आरती आणि त्याचेंच कीर्तन.

एखाद्या पारावर किंवा कुठल्या तरी चौथऱ्यावर एक दगड आणून बसवायचा कीं झाला गणपति. मग तीं मुलें पांगायचीं. कोणीं फुलें आणायचीं, कोणीं पत्री आणायची, कोणीं दूर्वा आणायच्या. बल्लाळ स्वतः खिरापत घेऊन येई. अन् तीसुद्धा थोडीथोडकी नव्हे; तर मोठा वाडगा भरून. त्याचा बाप वाणी होता. त्याच्या दुकानांत खाद्यपदार्थ भरलेले होते. दाणे होते, गूळ होता, खोबऱ्याच्या वाटया होत्या अन् देणारी त्याची वत्सल माउली होती.

पोरांना आणखी काय पाहिजे ! हाक मारतांच तीं धांवत येत आणि त्याच्या खेळांत सामील होत तीं केवळ या खिरापतीसाठीं. खिरापत समोर दिसली कीं तीं जोराजोरानें आरत्या आणि मंत्रपुष्प म्हणूं लागत. उभी आळी दणाणून सोडीत.

त्या कटकटीनें लोक त्रस्त झाले. 'काय आरडाओरडा हा ; सदान्कदा सुखकर्ता दुःखहर्ता—या पोरट्यांना शाळा, अभ्यास वगैरे कांहीं आहे कीं नाहीं !' अशा तक्रारी सगळीकडून उठूं लागल्या. या सगळ्याचें मूळ बल्लाळ आहे हें लोकांना ठाऊक होतें. पण तो पडला नगरशेटीचा मुलगा. त्याला बोलायचें कोणीं ! आई-बापांनीं आपापल्या पोरांना आवरण्याचा खूप प्रयत्न केला. पण मुलांना अभ्यासापेक्षां आणि शाळेपेक्षां त्या खिरापतीचाच लोभ अधिक होता. तीं कसचीं ऐकतात !

गांवांत असें काहूर माजलें, तेव्हां पोरांनीं एक निराळाच मार्ग शोधला. जवळपास खेळायचें सोडून ते सरळ रानांत गेले. तिथें एक शमीचें झाड त्यांना दिसलें. त्या झाडाखालीं सर्वांनीं मिळून दगड-माती वाहून आणली आणि एक लहानसें देऊळ उभारलें. बल्लाळानें एका दगडावर ठाकठोक करून त्याला ओबडधोबड गणपतीचा आकार दिला. पोरांनी 'मंगलमूर्ति मोरया' म्हणून तो दगड उचलला आणि मंदिरांत त्याची स्थापना केली. सर्वांनीं मिळून त्याची भरघोस पूजा बांधली. त्या दिवशीं बल्लाळानें सुंदर कीर्तन केलें. कीर्तनांत भावभक्तीच्या उमाळ्यानें तोहि रडला आणि त्यामुळें इतर मुलांचेहि डोळे ओले झाले.

त्या दिवसापासून बल्लाळाला घरापेक्षां रानाचीच ओढ अधिक लागली. आपल्या दिवाणखान्यापेक्षां त्या छोट्या ठेंगण्या मंदिरांतच त्याचा जीव अधिक रमूं लागला. आपली तहान—भूक त्यानें देवालाच वाहिली. कोणी बोललें कोणी दटावलें, तर तीं गाऱ्हाणीं तो देवापुढेंच मांडूं लागला. 'देवा, मला दर्शन दे ; देवा माझ्याशीं बोल ; देवा, माझ्या सौंगड्यांना

त्यांचे आईबाप मारतात, त्यांना सद्बुद्धि दे; देवा, माझ्या आईला, वडिलांना, सगळ्या गांवालाच तुझ्या भजनीं लाव—' अशा नाना प्रकारच्या प्रार्थना तो देवाला करी. दाटल्या गळ्यानें अन् पाझरत्या दृष्टीनें देवाला आळवी.

बल्लाळ तर पुरता देवलसी झालाच आणि त्याच्याबरोबर गांवांतलीं पोरेंहि त्याच नादाला लागलीं. 'तुमच्या मुलाच्या नादानें आमचीं पोरें



बल्लाळाच्या बापाकडे गाऱ्हाणीं

बिघडलीं' म्हणून गांवांतल्या लोकांनीं कल्याणशेटकडे गाऱ्हाणें नेलें. 'तुम्ही तुमच्या मुलाला आवरणार नसाल तर आम्ही दिवाणांत दावा मांडूं' असेंहि सांगायला कांहीं लोकांनीं कमी केलें नाहीं. या गोष्टीनें कल्याणशेट चिडला. आधींच त्याला मुलाचा राग होताच. त्यांत या तक्रारींची भर पडली. घरांत येऊन त्यानें रागारागानें मुलाला हांक मारली. 'बल्ला ऽऽळ...!'

पण बल्लाळ होता कुठें घरांत? तो आपल्या देवळांत देवापुढें बसला

होता. कोणाच्या राग-लोभांची त्याला पर्वा नव्हती. तो फक्त गणपतीच्या रागलोभाची तेवढी कदर करीत होता. त्याचें अंत:करण गणेशभक्तीनें भरून गेलें होतें. तो देवाला म्हणत होता, ' त्वमेव माता च पिता त्वमेव— '

मुलगा घरांत नाहीं असें पाहून कल्याणशेट चवताळला. चौकशी करतां त्याला समजलें कीं पोर रानांत जाऊन बसल आहे. जवळच्याच एका मुलाला वाटाड्या म्हणून त्यानें बरोबर घेतलें आणि तो रानाची वाट चालूं लागला. त्यानें आपल्या हातांत एक बळकट वेताची छडी घेतली होती. पोराच्या रागानें त्याच्या तळपायाची आग मस्तकाला गेली होती. तो ज्या ठिकाणीं पोंचला होता तें स्थान प्रसन्न होतें, सुंदर होतें. ऊन होतें तें झाडांच्या माथ्यांवर. खालीं सगळी सावली. झुडुपाझुडुपांतून चिमण्या नि इतर पांखरें किलबिलत होतीं. हिरव्या रानावर तांबडी पालवी लुसलुसत होती. वेली फुलल्या होत्या. बारक्या रोपट्यांना फुलांचे तुरे आले होते. सूक्ष्मसा सुगंध सगळीकडे दरवळला होता. तें शमीचें कांटेरी झाड वाऱ्यावर डोलत होतें. त्याच्या खालचें तें ठेंगणें ओबडधोबड मंदिर निवांत होतें आणि त्यांत बसलेला बल्लाळ तर ध्यानस्थच होता. गजाननाच्या चिंतनांत त्याची तंद्री लागली होती. बाप आपल्याला शोधीत आला आहे. त्याच्या हातांत वेताची छडी आहे, डोळ्यांत क्रोधाचा अंगार फुलला आहे, तो आपल्याला बेदम चोपणार आहे, आतां इथून पळालें तरी पाहिजे किंवा त्याच्या पायां तरी पडलें पाहिजे, यांपैकीं त्याला कश्शाकश्शाची जाणीव नव्हती.

बापाच्या हातची छडी रप्दिशीं पाठींत बसली तेव्हां त्याची समाधि उतरली. मुलानें डोळे उघडलेले पाहून बापानें आणखी एक आवाज काढला. पण बल्लाळ रडेना किंवा चुकलोंहि म्हणेना. देहाचा मार देह सोशील; आपल्याला त्याचें काय, अशा वृत्तीनें जणूं तो स्तब्ध आणि निश्चल राहिला.

यामुळें बापाचा राग अधिकच पेटला. तोंडानें शिव्याशाप अन् हातानें छडीचे प्रहार असें सत्र त्यानें बराच वेळ चालविलें. हें कार्टे असला देव-



बल्लाळला बाप मारीत आहे

भोळेपणा करूं लागलें तर आपल्या व्यापारधंद्यांत तें निरुपयोगी ठरेल, असलें पोर असलें काय, नसलें काय सारखेंच; या विचारानें तो विवेकभ्रष्ट झाला होता.

त्यानें बल्लाळाला दरदरां ओढीत बाहेर आणलें. भुईवर सरपटणारी एक वेल ओढून घेतली. मुलाला शमीच्या झाडाशीं उभें केलें आणि त्या वेलीनें बुंध्याला घट्ट जखडून टाकलें. हात बांधले, पाय बांधले अन् पोटहि आवळलें. मग तिथून परततांना तो बल्लाळाला म्हणाला—

" मर आतां इथें. अन्नपाण्यावांचून तळमळ. तुझ्या देवाच्या नांवानें हाका मार. तो येईल अन् तुला सोडवील. अन्नपाणीसुद्धा तोच घालील. "

कल्याणशेटनें असें म्हटलें खरें ; पण तें बल्लाळला ऐकूं गेलें नाहीं. कारण बापाच्या निर्दय झोडपणीनें तो बेशुद्ध झाला होता आणि तशाच स्थितींत बापानें त्याला बांधून घातलें होतें. मुलाची बेशुद्धि हें तो ढोंग समजत होता.

असलें हें अविचारी कृत्य करून कल्याणशेट घरीं आला. तरीहि त्याचा राग निवला नव्हता. त्याचे डोळे उग्र दिसत होते. कल्याणशेटची बायको इन्दुमती. ती बल्लाळची वाट पाहात बसली होती. आपला नवरा शोधाला गेला आहे, तो मुलाला घेऊन परत येईल, असें तिला वाटलें होतें. पण तो एकटाच आला अन् आला तोहि फुंफाटत. इन्दुमतीचा जीव घाबरला. तिनें कावऱ्याबावऱ्या विचारलें कीं 'बल्लाळ कुठें आहे ?' त्यावर कल्याण-शेटनें उत्तर दिलें कीं ' बल्लाळ गेला मसणांत.' बिचारी माउली. तिच्या काळजाला चरका बसला. डोळ्यांतून गंगायमुना वाहूं लागल्या. तिनें कळवळून नवऱ्याला म्हटलें.

" असे कसे हो निर्दय तुम्ही ! माझ्या पोराला रानांत टाकून कसे आलांत ? मला तरी सांगा तो कुठें आहे तें. मी त्याला घेऊन येतें. "

पण तिच्याशीं बोलतां बोलतां कल्याणशेटच्या डोळ्यांपुढें काजवे चमकूं लागले. समोर उभी असलेली बायको त्याला अंधुक दिसूं लागली. आपला दिवाणखाना, त्याच्या भिंतीवरचीं चित्रें, तिथें लोंबवलेलीं हंड्या झुंबरें, खुंटीवरचे अंगरखे, कोपऱ्यांतली काठी, साऱ्या साऱ्या वस्तू त्याला सारवल्यागत दिसूं लागल्या. क्षणाक्षणाला सभोंवतीचें जग जणूं कसल्या-तरी काळ्या सागरांत गडप होत आहे असें दिसूं लागलें. हात उचलला हात दिसेना, पाय पुढें टाकला तो दिसेना. कल्याणशेट एकाएकीं पूर्ण आंधळा झाला.

पण एवढ्यावरच त्याचा कर्मभोग थांबला नाहीं. कानांत 'घों ऽऽघर्र ऽऽ!' असले कांहीं चमत्कारिक आणि भयानक आवाज होऊं लागले आणि थोड्याच वेळांत त्याला बहिरेपण प्राप्त झालें. तो रूपाला आंचवला तसा नादालाही मुकला. एकामागून एक त्याचीं सगळींच ज्ञानेंद्रियें स्तब्ध झालीं आणि एवढ्यानेंच शिक्षा पूर्ण झाली नाहीं म्हणूनच कीं काय ; त्याच्या अंगाची आग सुरू झाली. तांब्या तांब्या पाणी पिऊनहि ती आग शमेना. घडेच्या घडे डोक्यावर ओतूनहि तो दाह थांबेना. कल्याणशेट गडबडां लोळूं लागला. असहायपणें आक्रंदूं लागला. बिचारी इन्दुमती. एका बाजूनें मुलाचा पत्ता नाहीं अन् दुसऱ्या बाजूनें नवऱ्याची ही भयंकर अवस्था. रडायचें म्हटलें तरी तिचे अश्रू सुकून गेले. नवऱ्याला आराम पडेल असें काय करावें तेंच तिला सुचेना. कल्याणशेट सारखा ओरडतो आहे आणि इन्दुमती सांकळल्यासारखी, गोठल्यासारखी तिथें उभी आहे.

कल्याणशेटची अशी अवस्था होण्याचें कारण काय? पण तें शोधायला त्या रानांत, त्या शमीच्या झाडाखालीं गेलें पाहिजे.

झाडाला बांधून कल्याणशेट निघून आल्यावर बल्लाळ कांहीं वेळ त्याच बेशुद्धावस्थेंत होता. नंतर तिथें एक ब्राह्मण प्राप्त झाला. कुठून आला न कळे. शुभ्र पंचा, शुभ्र जानवें, शुभ्र केंस अन् अंगावर शुभ्र वस्त्र, असा त्याचा वेष होता. त्यानें तिथें येऊन बल्लाळाला मोकळें केलें. अंगावरून हात फिरवून सावधहि केलें. मग त्याला घेऊन तो ब्राह्मण त्या देवळांत आला. बल्लाळानें समोर पाहिलें. त्याचा आवडता देव गणपति, मागें लोटून दिलेला होता. पूजा उध्वस्त केलेली होती. धूप, दीप, नैवेद्य, फाफरून टाकलेले होते. तें पाहून बल्लाळाच्या बालहृदयावर जणूं वज्रप्रहार झाला. त्याच तिरिमिरींत त्याच्या तोंडून असे शब्द निघून गेले.

"माझ्या देवाची अशी अवस्था ज्यानें केली असेल, त्याचे कान, डोळे फुटोत. त्याच्या अंगाची आग आग होवो!"

आणि हीच बल्लाळाची शापवाणी कल्याणशेटला बाधली होती. ब्राह्मणानें त्याला म्हटलें कीं, 'तूं शाप दिलास हें योग्य केलें नाहींस.' त्यावर बल्लाळ रागानें म्हणाला.

" मला तुमचा उपदेश नको. माझ्या देवाचा असा अपमान, त्याची ही अशी दुर्दशा, मला सहन होणार नाहीं."

तो वृद्ध ब्राह्मण हसला अन् म्हणाला. 'मुला, तुझा देव तो मीच आहें. बघ माझ्याकडे. माझी दुर्दशा कोणी करूं शकत नाहीं. तुझी भक्ति मी पाहिली. तूं मला आवडलास. म्हणून तुला दर्शन देण्यासाठीं मी आलों आहें.'

" छट्! तूं कसला देव? मला फसवतोस होय? माझा देव असा म्हातारा नाहीं. तूं गणपति ना, मग तुझी सोंड कुठें आहे ती दाखव. तुझे चारहि हात दाखव. म्हणे गणपति! माझ्या गणपतीचें पोट केवढें मोठें मोठें आहे अन् तुझें पोट तर पाठीस लागलें आहे. मी नाहीं अशानें फसायचा..."

ब्राह्मण पुन्हा हसला. त्यानें त्याला आणखी जवळ घेऊन कुरवाळलें. तो मृदु वाणीनें त्याला बोलला. 'तुझें या दर्शनानें समाधान होत नसेल तर तूं जसें माझें ध्यान करतोस तसें मी तुला दर्शन देईन. माझ्या लाडक्या भक्तराजा, इथें बैस आणि डोळे मिटून माझें ध्यान कर.'

असें बोलून तो ब्राह्मण एकदम अदृश्य झाला. बल्लाळाला तो चमत्कार वाटला; पण त्यानें त्या ब्राह्मणावर विश्वास ठेवला. तो त्या देवळांत डोळे मिटून ध्यानस्थ बसला. भक्तीमुळें त्याचें चित्त लगेच एकाग्र होत असे. याहि वेळीं तसेंच झालें. थोड्याच वेळांत त्याला मेघासारखी गंभीर वाणी ऐकूं आली.

" बल्लाळा, बालभक्ता! डोळे उघड. मला पहा."

बल्लाळानें डोळे उघडले. तों काय, सगळेंच आश्चर्य! देऊळ उंच आणि लांब झालें आहे. त्याला कोरलेले खांब आहेत. हंड्या-झुंबरें लटकत आहेत. सोन्याचांदीनें मढवलेले दरवाजे झळाळत आहेत. गाभारा प्रकाशानें

भरून ओसंडतो आहे. आणि त्यांत बल्लाळाचा देव गजानन आपल्या मूळ स्वरूपांत उभा आहे. त्याच्या मुद्रेवर हास्य आहे. डोळयांत करुणा आहे. अन् शब्दांत माधुर्य आहे. ही सगळी अघटित घटना पाहून बल्लाळाच्या विस्मयाला पारावार उरला नाहीं. तो नुसता बघतच राहिला. उठावें, लोटांगणीं जावें, पाय धरावे, याचें त्याला भानच उरलें नाहीं. देवाला त्याच्या त्या अवस्थेचेंहि कौतुकच वाटलें त्यानें विचारलें.

" पाहिलेंस मला......झालें समाधान ! तुला जसा मी हवा होतों तसा मी प्रगट झालों ना...! "

मग मात्र बल्लाळ एकदम उठला. ' होय देवा ' म्हणून त्याच्या चरणांना जाऊन बिलगला. देवानें त्याला उठवून हृदयाशीं धरलें. देव भक्तांचा सुखसंवाद सुरू झाला.

" देवा, केवढी तुझी ही अपार माया ! माझें मोडकें तोडकें देऊळ तूं कळसाचें केलेंस, सोन्यानें मढवलेंस. सगळया रानाचीच कळा पालटून टाकलीस. हें समोरचें उद्यान काय, त्यांत नाचणारे मोर काय, त्या पुष्करिणी काय, हा फुलांचा सुगंध काय—सगळेंच अजब ! "

" बल्लाळा, हें सर्व तुझ्यासाठीं. तुझ्या भक्तीसाठीं. हें सगळें ऐश्वर्य म्हणजे माझ्या हातचा मळ आहे. तुझी भक्ति इतकी निकराची आहे कीं, तिला कितीहि केलें अन् कितीहि दिलें तरी तें थोडेंच. अजून तुला काय हवें असेल तर तें मागून घे. "

त्यावर बल्लाळ म्हणाला.

" देवा, मी जातीचा वाणी असलों तरी वृत्तीचा नाहीं. मी तुझी इतकी भक्ति करावी आणि तूं मला तिच्या मोबदल्यांत अमुक तमुक द्यावेंस असा मला माझ्या भक्तीचा व्यापार करायचा नाहीं. तुझें दर्शन झालें त्याच

वेळीं माझ्या सकल कामना पूर्ण झाल्या. देणारच असलास तर तुझी अखंड कृपा दे... ”

गजाननाला त्या बालजीवाचें मोठें कौतुक वाटलें. त्याला कसलाहि लोभ नव्हता, कसलीहि हांव नव्हती. तो निजानंदीं तृप्त होता. अशा भक्ताचेंच देवाला अधिक कोडकौतुक. गणरायानें त्याला असा एक वर दिला कीं त्यामुळें त्याचें नांव चिरंजीव रहावें.

“ माझ्या बालभक्ता, आजपासून मी या ठिकाणीं अंशरूपानें कायमचा राहीन. इथें तुझ्या नांवाला माझें नांव जोडलें जाईल. मला लोक ‘ बल्लाळ विनायक ’ म्हणतील. भाद्रपद शुद्ध चतुर्थीच्या दिवशीं जे कोणी इथें येऊन माझें दर्शन घेतील, ते चिंतिलें पावतील. ”

# शिवकांची

मानवाला मोक्ष देणाऱ्या सात पुऱ्या भरतखंडांत प्रसिद्ध आहेत. त्यांमध्यें शिवकांचीचें महत्त्व फार आहे. शंकराचीं पंचमहाभूतात्मक पांच लिंगें प्रसिद्ध असून तीं सगळीं मद्रास राज्यांतच आहेत. त्यांपैकीं पृथ्वीतत्त्वाचें क्षितिलिंग शिवकांचींत आहे. हे लिंग वाळूचें बनवलेलें असल्यामुळें यावर जलाचा अभिषेक होत नाही. फक्त चमेलीचें अत्तर लावून त्याचें स्नान संपादितात. शिवकांचीचे मंदिर विशाल आहे, फार मोठ्या जागेवर पसरलें आहे आणि सुंदरहि आहे.



कांचीचें शिवमंदिर

याचें खरे नांव कांचीपुरम्. त्याचा आतां कांजीवरम् असा अपभ्रंश झाला आहे. चिंगलपेठ जिल्ह्यांतलें हें एक तालुक्याचें ठिकाण. पूर्वी ही पल्लव राजांची राजधानी होती. उत्तरेला काशी जशी विद्येसाठी प्रसिद्ध, तशीच दक्षिणेला कांची. दोन हजार वर्षांपूर्वीपासून तिची ही प्रसिद्धि आहे. शिवकांची, विष्णुकांची आणि पिल्लेयरपालियम् असे या शहराचे तीन भाग झालेले आहेत. शिवकांचींत शिव नांदतो ; तर विष्णुकांचींत विष्णु वास्तव्य करतो. बौद्ध आणि जैन यांचींहि इथें मंदिरें आहेत.

इथलीं सर्व देवळें मोजायचीं असे ठरविलें तर त्यांची संख्या हजारावर जाईल. त्यांतल्या त्यांत एकांबरेश्वर, ज्वरहरेश्वर, कामाक्षी इत्यादि कांहीं मंदिरें दर्शनीय आहेत. शिवकांचीचा सर्वांत मोठा उत्सव चैत्र महिन्यांत होत असतो. त्या वेळीं शिवपार्वतीचें थाटामाटानें लग्न लावतात.

सतराव्या शतकाच्या शेवटीं कांजीवरम् हे शहर मराठ्यांनीं जिंकून घेतलें होतें ही गोष्ट लक्षांत ठेवायला हवी. इथे मंदिराच्या मागें जुनाट असा एक आम्रवृक्ष आहे त्याच्याच खालीं पार्वतीनें तप केलें. शिवाहि तिथेंच प्रगट झाला आणि या स्थानाला क्षेत्रपदवी मिळाली. तीच मूळ कथा पुढें दिली आहे.

* * *

पार्वतीला शिव हा इच्छित वर मिळाला. तिनें तपस्येच्या बळावर तो मिळवला. दोघांचाहि चंद्रमौळी संसार कैलासावर थाटला. जगाच्या दृष्टीनें त्यांच्या संसारांत कसलेंहि ऐश्वर्य नव्हतें. कसलाहि झगमगाट नव्हता.

पण उभयतांच्या अंतरांत प्रेम मात्र अमूप होतें. प्रेमाच्या जोडीला कला होती. शिव तर तांडवनृत्याचा प्रणेताच. पार्वतीहि तशीच नृत्यकुशल होती. त्या दोघांच्या जीवनांत नाट्य तर अभिजातच होतें. प्रेमाचा आधार आणि कलेचा आनंद. शिवाय जगाच्या कल्याणाविषयीं उभयतांच्याहि अंतरांतली उत्कट आकांक्षा. या गोष्टीमुळें त्यांचा संसार हृदयंगम झाला होता.

एक दिवस शिव एका वृक्षातळीं संध्येचे रंग निरखीत बसला होता. त्या निरीक्षणांत तो तन्मय झाला होता. एवढ्यांत पाठीमागून आली जगन्माता पार्वती. तिनें पाहिलें कीं, स्वारीचें आपल्या येण्याकडे लक्ष नाहीं. मग तिनें एक गंमत करायचें ठरवलें. ती हळूच पाऊल न वाजवतां श्वास रोधून शिवाच्या पाठीमागें आली आणि चटकन् तिनें शिवाचे तिन्ही डोळे आपल्या मऊ, आरक्त आणि लांबसडक अशा बोटांनीं झांकले.

दोन ओळीचे अन् तिसरा त्याच्या भाळावरचा. हेतु हा होता कीं, शिवानें तिला ओळखावें अन् म्हणावें. ‘ ओळखलें; सोड डोळे. ’

शिवानें तसेंच म्हटलें. पार्वतीनें हसत हसत त्याच्या डोळ्यांवरचीं



शिवाची डोळेझांक

आपलीं बोटें काढलीं. तिन्ही नेत्र एकदम प्रभात वायूनें कमळ उमलावें तसे उमलले. उभयतांची दृष्टादृष्ट झाली.

पार्वतीला वाटलें होतें, कीं कैलासनाथ आपलें कौतुक करील. पण कौतुक राहिलें बाजूला. शिव एकाएकीं खिन्न, उदास दिसूं लागला. पार्वती घाबरली. तिनें घायकुत्या शब्दांत विचारलें.

“ राग आला का ? ”

" नाहीं. "

" मग मुद्रा अशी कां ? "

" विश्वांत अनर्थ ओढवल्याबद्दल. "

" अनर्थ ओढवला ? तो कसा काय ? "

" पार्वती, तुला माहीत आहे, कीं माझे तीन डोळे म्हणजे सूर्य, चंद्र, आणि अग्नि आहेत. साऱ्या विश्वाला तेच प्रकाशित करतात. तेच जीवन देतात. "

" बरं मग ? "

" तूं ते तिन्ही एकाच वेळीं बंद केलेस, त्यामुळें विश्वांत प्रकाशहि उरला नाहीं आणि उष्णताहि राहिली नाहीं. पार्वती, एकच क्षण तूं ही गोष्ट केलीस; पण तेवढ्यांत विश्वांतल्या मानवांचीं एक कोटी वर्षें खलास झालीं. सूर्य नाहीं म्हणजे प्रकाश नाहीं, जीवन नाहीं. चंद्र नाहीं म्हणजे आल्हाद नाहीं, पोषण नाहीं. आणि अग्नि नाहीं म्हणजे विश्वसंसाराच्या गाड्याचा कणाच मोडला. गौरी, तुझा एका क्षणाचा खेळ झाला; पण त्यामुळें विश्वावर केवढी प्रलयाची आपत्ति ओढवली... "

" आतां काय करायचं ? "

" दुसरं काय ! या गोष्टीचं तुला प्रायश्चित्त घ्यायला हवं. "

" अवश्य घेतें. सांगा, कोणतं दिव्य करूं ? "

" कैलासावरून खालीं उतर आणि तपश्चर्या कर. "

पार्वतीनें ती आज्ञा शिरसामान्य केली. आपल्या अल्पशा कृतीनें विश्व अनर्थांत सांपडलें याचें तिला वाईट वाटलें. त्यामुळें कैलासावरून उडी घे, असें जरी शंकरानें तिला सांगितलें असतें तरी ती गोष्टहि तिनें न कचरतां केली असती. तपश्चर्या तर तिला नित्य परिचयाचीच होती. तिचें तिला मुळींच दुःख वाटलें नाहीं.

ती स्थिर अंतःकरणानें हिमालय उतरली. तिथून अनेक देश, नद्या, पर्वत ओलांडीत भरतखंडाच्या दक्षिणेला कांची नगरींत प्रविष्ट झाली कांचीच्या जवळून कंपा नदी वाहात होती. तिचा प्रवाह निर्मळ होता. आजूबाजूला मन प्रसन्न ठेवील असा निसर्गाहि होता.



पार्वतीची तपश्चर्या

पार्वतीला तें स्थान आवडलें. ती कंपा नदीच्या तीरावर आली. तिनें वेणी सोडून केसांचा जटाजूट बांधला. वस्त्र टाकून वल्कल धारण केलें. गोऱ्या तनूवर भस्म चर्चिलें. पार्वती तपस्विनी बनली, योगिनी बनली. नदीकांठच्या वाळूचें एक शिवलिंग बनवून तिनें जवळच्या एका आम्रवृक्षाच्या खालीं त्याची स्थापना केली आणि ती वृक्षाच्या शीतल छायेंत तपाला बसली. शिव वर मिळावा म्हणून पूर्वी हिमाचलावर जशी बसली होती तशी. त्याच निग्रहानें, त्याच निर्धारानें.

महिन्यामागून महिने गेले. वर्षामागून वर्षें लोटलीं. पृथ्वीवर शेंकडों उन्हाळे पावसाळे आले आणि गेले. कंपा नदी कितीदा तरी भरली आणि सुकली. तिचा तो छायादानी आम्रवृक्ष अनेकदा मोहोरला, फलभारानें लवला आणि झडला. पुढें तर तो सगळाच्या सगळा जीर्ण अन् म्हातारा दिसूं लागला.

पण पार्वती तशीच आणि त्याच ठिकाणीं बसली होती. जागेपणीं आणि डुलकीच्या वेळींसुद्धा तिचे ओंठ ‘ नमः शिवाय ’ हा एकच मंत्र

पुटपुटत होते. शंकर कैलासावरून तिचें हें तप पहात होता. त्याला तिचें कौतुक वाटत होतें. तो म्हणूं लागला होता कीं आतां हिला तपावरून उठवावें. पण त्याआधीं त्यानें तिची एक परीक्षा घ्यायचें ठरवलें. या परीक्षेंत पार्वती उतरावी अशी त्याला आकांक्षा होती आणि तशी खात्रीहि होती.

आणि एक दिवस ध्यानीं मनीं नसतां कंपा नदीस महापूर आला. तिचे दोन्ही तट धडाधड कोसळूं लागले. लाल मातीनें पाणीहि लाल लाल झालें. धो धो असा एक प्रचंड ध्वनि माजला. प्रवाहावर मोठमोठ्या लाटा उसळूं लागल्या अन् भोंवरेहि पडूं लागले. झुडपें, पशुपक्षी, जीवजीवाणू हीं सगळीं धारेला लागून वाहत चाललीं. नदीचें पाणी पात्राच्या मर्यादा मोडून तोडून कोसन्‌कोस आजूबाजूला पसरलें. पार्वतीनें पाहिलें कीं, प्रवाह चोहों बाजूंनीं आपल्याला घेरतो आहे. प्रत्येक लाट आपल्याजवळ येण्यासाठीं, आपल्याला ग्रासण्यासाठीं पुढें पुढें फुटते आहे.

पार्वतीचे डोळे विस्फारले. मागून पुढून जणूं वरुणदेवच खवळून उठला आहे असें तिला वाटलें. ती शहारली, घाबरली, अगतिक झाली. स्वतःचा अंत ओढवणार म्हणून नव्हे; तर आपण निर्माण करून स्थापलेलें शिव-लिंग नष्ट होणार म्हणून. आतां अधिक विचार करायला अवसरच नव्हता. तें लिंग वांचवायला हवें होतें आणि त्यासाठीं एका हृदयाशिवाय दुसरी कुठलीहि सुरक्षित जागा तिला मिळण्या-जोगी नव्हती. म्हणून तिनें दोन्ही हात खालीं घालून तें लिंग उचललें अन् आपल्या हृदयाशीं धरलें. दोन्ही भुजांनीं त्याला घट्ट कवटाळलें. आपल्या मस्तकाचें त्यावर तिनें छत्र केलें.



पार्वतीचें सत्त्वधैर्य

आणि आतां काय होणार असेल तें होवो, या निर्धारानें ती डोळे मिटून खंबीरपणें बसून राहिली. यापुढची लाट तिच्याच अंगावर फुटणार होती आणि दुसऱ्या बाजूनें आणखी एक तशीच पाठीवर आदळणार होती. पार्वती त्याच क्षणाची वाट पहात राहिली.

पण तो घोंघावणारा काळनाद् एकाएकीं थांबला आणि त्याऐवजीं दुसराच एक गंभीर पण प्रेमळ असा शब्द् उमटला.

" पार्वती, नदीचा पूर ओसरला. संकट टळलें. लिंग खालीं ठेव आणि डोळे उघडून पहा. "

पार्वतीनें डोळे उघडले. समोर पाहते तों साक्षात् भगवान् शिवशंकर उभा. किती तरी वर्षांनीं तिचा स्वामी तिला दिसला होता. त्याचा शब्द् तिला ऐकूं आला होता. तें रूपडें पुढें पाहून पार्वतीचा कंठ सद्गदित झाला. अंगावर रोमांच उठले. डोळयांतून प्रेमधारा सुरू झाल्या. कसेंबसें ती उद्गारली. ' भगवन् ! ...... '

शिव तिला कौतुकाच्या नजरेनें न्याहाळून बोलला. ' गौरी, कैलासापेक्षांहि तुझं तप उंच आहे अन् तुझं यश धवल आहे. तुझ्या शक्तीचा महिमा मीहि जाणूं शकत नाहीं. तूं ज्या वालुकालिंगाची पूजा केलीस, तें आतां वरदानी झालं आहे. जो इथें येऊन याची उपासना करील आणि त्याजबरोबर तुझ्या तपस्येची कथा ऐकेल, त्याच्या मनकामना पूर्ण होतील. या लिंगांत मी पृथ्वीरूपानें राहीन. तूं आतां ऊठ. अजून तुझी तपस्या संपली नाहीं. अजून तुला विश्रांति घ्यायला सवड नाहीं. तूं इथून गौतमाश्रमीं जा. तिथें अरुणाचलतीर्थांत स्नान कर आणि पुन्हां तपश्चर्येला लाग. कांहीं कालानंतर मी तिथें तेजोरूपानें तुला भेटेन. "

पार्वतीनें एकवार शिवाच्या मुद्रेकडे आज्ञाधारक दृष्टीनें पाहिलें आणि प्रसन्न वाणीनें म्हटलें.

" भगवन् ! जशी आपली आज्ञा ! "

---

# सेतुबंध-रामेश्वर

काशी-रामेश्वर या दोन क्षेत्रांचा आपण जोडीनें उच्चार करतों. या दोन स्थानांविषयीं भारतीयांना फार मोठा आदर वाटतो. दोन्ही ज्योतिर्लिंगेंच आहेत. काशीची गंगा रामेश्वराला नेऊन वाहायची अन् रामेश्वरचा सेतु ( वाळू ) काशीविश्वेश्वराला वाहायचा, असा या दोन्ही स्थळांचा परस्परसंबंध भारतीय संस्कृतीनें जोडून दिला आहे.

रामेश्वर हें तामिळनाडमध्यें मदुरा जिल्ह्यांत आहे. गांव समुद्रतीरावर



रामेश्वर-मंदिर

असून लहानसेंच आहे. इथले रामेश्वराचें मंदिर प्रचंड अन् विस्तीर्ण आहे. त्या देवळाच्या आवारांतच एक मोठें गांव वसूं शकेल. मंदिराच्या समोर विशाल नंदी आहे. शेंकडों शिवमूर्ती प्राकारांत हारीनें मांडलेल्या आहेत. तेवढ्या आवारांतच २४ तीर्थें आहेत. शिवाय बाहेरचीं तीर्थें वेगळीं.

या क्षेत्रांत लक्ष्मणतीर्थावर मुंडन, समुद्रावर स्नान आणि गंधमादन पर्वतावरच्या रामझरोक्यांतून सेतूचें दर्शन या कृत्यांना महत्त्व आहे. तिथले तीर्थोपाध्याय आणि पुजारी बहुतेक महाराष्ट्रीय ब्राह्मणच आहेत. तिथें रामेश्वर, पार्वती, आणि नंदी यांच्या सुवर्णमूर्ती आहेत. उत्सवाच्या वेळीं रथांतून त्यांची मिरवणूक निघते. सर्वांत मोठा उत्सव म्हणजे रामेश्वराचा विवाह. तो श्रावणांत नागपंचमीला होतो.

इथून पंधरा मैलांवर धनुष्कोडी नांवाचें तीर्थ आहे. तिथे हिंदी महासागर अन् बंगालचा उपसागर यांचा संगम झाला आहे. रामचंद्रानें समुद्रावर बाण सोडला तो या ठिकाणी उभें राहून असे सांगतात. म्हणून इथें समुद्रस्नान आणि धनुष्यपूजा हे दोन विधी महत्त्वाचे आहेत. रेल्वेचा एक फांटा धनुष्कोडीपर्यंत आलेला आहे. शिवाय हें मोठें बंदरहि आहे. सिलोनला जाणाऱ्या बोटी इथूनच सुटतात.

रामानें समुद्रावर सेतु बांधला आणि अठरा पद्में वानरांसह लंकेवर स्वारी केली असें रामायणांत वर्णिलें आहे. या सेतुबंधाजवळ रामानें शंकराचें लिंग स्थापले म्हणून या शिवाचें नाव सेतुबंध-रामेश्वर असें पडलें. इथें हनुमंतानेंहि एक लिंग स्थापलें असून तें रामेश्वराच्या समोरच आहे. रामानें लिंग कां स्थापलें आणि हनुमंतानें निराळें कां बसवलें ती कथा पुढें दिली आहे.

* * *

प्रभु रामचंद्रानें समुद्रावर सेतु बांधून लंकेवर स्वारी केली. राम-रावणांचें युद्ध जुंपलें. त्या युद्धांत रामानें रावणाला मारलें. रावणाच्या बंदींत पडलेल्या इंद्रादि देवांना मुक्त केलें. बिभीषणाला लंकेचें राज्य दिलें. ज्या कार्यासाठीं अवतार धरला होता तें कार्य पुरें करून राक्षसांच्या अन् वानरांच्या जयघोषांत रामचंद्र अयोध्येला परत जाण्यासाठीं पुष्पक विमानांत बसला. रामाच्या वामांगी सीताहि आरूढ झाली. पुष्पक विमान आकाशांतून मार्ग क्रमूं लागलें.

समुद्राच्या ऐलतीरावर असलेल्या गंधमादन पर्वतावर रामरायाचा पहिला मुक्काम झाला. रामप्रभु कृतकार्य होऊन परत आला आहे असें

समजतांच ऋषींचे समुदाय रामाचें अभिनंदन करण्यासाठीं त्या ठिकाणीं गोळा झाले. रामरायानें या सर्वांचें प्रेमादरपूर्वक स्वागत केलें. मग यथोचित सत्कारहि केला. ऋषिजनांनीं रामरायाच्या अद्वितीय पराक्रमाची प्रशंसा



रामेश्वर-गाभाऱ्यांत

केली आणि देवांना बंधमुक्त केल्याबद्दल धन्यवादहि दिले. त्यावर रामप्रभु नम्रपणें बोलला कीं, 'हें सर्व आपल्या आशीर्वादाचं फळ!'

त्या प्रसंगीं बहुतेक ऋषींना एक गोष्ट जाणवली, कीं रामचंद्र असावा

तेवढा प्रसन्न नाहीं. त्याच्या मुद्रेवर कसल्या तरी विषादाची छाया आहे. एवढा घवघवीत विजय मिळाला, त्रिलोकीं कीर्ति गाजली, सीतामाईहि परत मिळाली अन् अशा स्थितींत हा विषाद कां, हें कोडें कोणालाहि उलगडेना. शेवटीं एका ऋषीनें त्याला विचारलेंच.

" प्रभुराज, ज्या क्षणीं सर्व चित्तवृत्तींना आनंदाचा फुलोरा यायचा, त्या क्षणीं तुमची मुद्रा अशी उदास कां दिसते ? "

त्यावर रामचंद्र अधिकच कष्टी झाला. ऋषिजनांनीं जणुं त्याच्या मर्मावरच बोट ठेवलें. तो म्हणाला.

" आपण म्हणतां तें खरें. चौदा वर्षांच्या प्रदीर्घ कालानंतर आज मी अयोध्येच्या वाटेवर आहें. या क्षणीं खरेंच मी आनंदानें उजळून निघायला हवें होतें. पण कर्मयोगानें तशी स्थिति नाहीं. माझ्या आनंदाला ग्रहण लागलें आहे. रावणाला मीं मारलें याचा अर्थ माझ्या हातून ब्रह्म-हत्या झाली. अन् ब्रह्महत्या म्हणजे केवढें महापातक... ! "

" असें कसें म्हणतां तुम्ही ! रावण हा दैत्य होता. यज्ञविध्वंसक होता. भूमीला भार होता. तिच्या काळजांत सलणारा कांटा होता. तोच तुम्ही... "

" होय, पण तो ब्रह्मकुलांत जन्मला होता. कांहीं झालें तरी त्याची हत्या ही लागणारच. अन् एवढें पापाचें ओझें जोंवर माझ्या शिरावर आहे तोंवर आनंद कुठून होणार ! "

" महाराज, तुम्ही वैकुंठपतीचे अंशावतार ! तुम्ही पुण्य—पापांच्या पलीकडचे. निर्विकल्प निरंजन ! "

" पण देह धारण केला आहे ना ? मग त्याच्या अनुषंगानें, बरेंवाईट पापपुण्य, हें सगळें येणारच ! तेव्हां तुम्ही मला या ब्रह्महत्येंतून मुक्त होण्याचा एखादा मार्ग सांगा. त्याशिवाय माझें चित्त कधींहि प्रसन्न होणार नाहीं. "

ऋषिजन विचारांत पडले. त्यांनीं आपसांत चर्चा करून रामरायाला सांगितलें कीं, ‘ तुम्ही या ठिकाणीं एका शिवलिंगाची स्थापना करा. तसें केल्यानें ब्रह्महत्येचें पातक जळून जाईल. ’

तें ऐकून रामाला पराकाष्ठेचा आनंद झाला. त्यानें म्हटलें कीं ‘ शुभं च शीघ्रम् ! तुम्ही मला मुहूर्त काढून द्या आणि मजकडून लिंगस्थापना करवून मला पापांतून सोडवून मगच परत स्वस्थानीं चला. ’

ऋषींनीं तें मान्य केलें. ज्येष्ठ शुद्ध दशमी, बुधवार, हा शुभ मुहूर्त काढून दिला. आतां साक्षात् राम लिंगस्थापना करणार म्हणजे तो कुठला तरी दगड लिंगाकार घडवून त्याची का स्थापना करील ! त्यानें कैलासावरच्या शिवाकडूनच लिंग आणायचें ठरवलें.

कुठें भरतखंडाच्या दक्षिणेचें समुद्रतीर अन् कुठें उत्तरेचा कैलास पर्वत ! दोन्ही स्थळांत शेंकडों योजनांचें अंतर. पण रामरायाला त्याची चिंता नव्हती. कारण समोरच परमभक्त हनुमान् हात जोडून उभा होता. शतयोजनें विस्तीर्ण समुद्र त्यानें एका उड्डाणांत उल्लंघिला, हें त्याचें अद्वितीय अचाट कृत्य त्याला ठाऊक होतें. अन् आतांसुद्धा तो आपल्या प्रभूसाठीं अंतराळांतल्या ग्रहगोलावरहि वेंघायला तयार होता. जितकें काम कठिण तितका त्याचा उत्साह अधिक. कैलासावरून लिंग आणायचें ही कल्पना रामाच्या मुखांतून बाहेर पडतांच त्याचे बाहू स्फुरूं लागले.

तें पाहतांच रामरायानें स्मित केलें अन् हनुमंताला म्हटलें.

“ माझ्या भक्तराजा ! तूं समोर होतास म्हणूनच मला ही कल्पना सुचली. जा. गगनमंडळांत झेप घे अन् महादेवाकडून लिंग मागून आण ! ”

‘ आज्ञा महाराज ’ म्हणून हनुमंतानें रामाच्या चरणीं मस्तक ठेवलें. तो कानठळ्या बसवणारा एकच बुभुःकार करून अंतराळांत झेपावला.

त्याचे बाहू पसरले. पायांत ताठरपणा आला. शेपटांत शक्ति संचरली.



मारुतीचें कैलासाकडे उड्डाण

त्याच्या शरीराला धनुष्यासारखा डौलदार आकार आला. वायुपुत्रच तो ! वायूच्या वेगानें नभांगण कापीत निघाला. योजनांमागून योजनें अंतर तुटूं लागलें. अनेक मैदानें, अनेक पर्वत, अनेक नद्या, पार करीत त्यानें हिमालय गांठला. बर्फानें शुभ्र झालेल्या कैलासाच्या शिखरावर पाय ठेवल्यावरच त्यानें विश्रांतीचा निःश्वास सोडला.

तिथून तो नम्रपणें अंजलिसंपुट जोडून शिवाच्या निवासस्थानाकडे निघाला. तिथें पोंचतांच त्याला कळलें कीं, महादेव कैलासावर नाहीं. कुठें गेला आहे हें कोण सांगणार ! शिवाची गति कोण जाणील !

हनुमान् हिंपुटी झाला. आपल्या श्रमाबद्दल त्याला नाहीं कांहीं वाटलें. आपल्या प्रभूचें कार्य अडणार हीच त्याला कष्ट देणारी गोष्ट होती.

कार्य न करतां परत जाणें हें तर लज्जास्पदच. मग प्रभूचा सेवक म्हणवून घ्यायचें तें कशाला! सीताशुद्धीसाठीं सुग्रीवानें पाठवलें त्या वेळीं सर्व वानर हताश होऊन समुद्रकांठी बसले तर त्यानें एकट्यानें समुद्र उल्लंघून जाण्याचें बळ बांधलें. नाना हिकमती लढवून लंकेंत संचार केला. सीतेला तर शोधून काढलेंच. शिवाय लंकादहन करून आपल्या पुच्छाचा प्रतापहि दाखवला. अन् आतां हात हालवीत परत जायचें म्हणजे—

छेः! वीर मारुतीला तें शक्य नव्हतें. तो तिथेंच मांडी घालून तपाला बसला. तपाच्या बळावर शिवाला कैलासी परत आणीन आणि त्याच्याकडून लिंग घेऊनच इथून निघेन असा त्यानें निर्धार केला. अन्न नाहीं, पाणी नाहीं. वरून बर्फाची गार गार वृष्टि! चहूं बाजूंनीं धुडगूस घालून अंगाला भेगा पाडणारा वारा. पण ज्याच्या अंगांत निर्धाराचें वज्रकवच, तो कसल्याहि आपत्ती लीलेनें तरून जातो.

दिवसामागून दिवस जाऊं लागले. समुद्रतीरावर राहिलेल्या रामाचे डोळे मारुतीच्या वाटेकडे लागले. लंकेंतल्या युद्धांत लक्ष्मणाला शक्ति लागली त्या वेळीं तो क्षण न लागतां द्रोणागिरि उपटूनच घेऊन आला होता. तो तसा वायुवेगानें आला म्हणूनच लक्ष्मणाचे प्राण परत मिळाले होते. मग आजच असें कां व्हावें? त्याला उशीर कां लागावा?

वानरांनीं मांडव घालून तो सजवला. ऋषिजन लिंगप्रतिष्ठेची सर्व तयारी करून बसले. दशमी तिथि उजाडली. पळापळानें मुहूर्त जवळ येऊं लागला. रामचंद्र अस्वस्थ झाला. ऋषिमुनी अस्वस्थ झाले. 'अजून मारुति दिसत नाहीं....' 'आला, आला, तो पहा....' 'छे हो! तो काळा ढग आहे. ...' 'हात्तिच्या! असेंच का?...' असे निराशेचे उद्गार सर्वांच्या तोंडून निघूं लागले. जो तो बसल्या जागीं चुळबुळ करूं लागला.

हा मुहूर्त टळला तर पुढें लवकर शुभ तिथि नव्हती. रामप्रभूला अयोध्येला जाण्याची घाई होती. लक्ष्मण आपल्या उर्मिलेला भेटायला उत्सुक झाला होता. जानकी आपल्या सासूबाईच्या दर्शनाला उत्कंठित झाली होती. रामप्रभूला तर पूर्वी ठरवून दिलेल्या दिवशीं अयोध्येला पोंचणेंच भाग होतें. तो दिवस चुकला तर नंदिग्रामांत डोळयांच्या पणत्या करून बसलेला रामभक्त भरत प्राणत्याग करणार होता. भरताचे प्राण रामाला स्वतःच्या प्राणांपेक्षांहि प्रिय होते. हें सगळें साधायचें तर आजच लिंगस्थापना व्हायला हवी होती. आणि त्याचसाठीं हनुमान तडातडीं यायला हवा होता.

दूर्वादलश्याम रामचंद्राच्या मुखावर निराशेची कृष्णछाया तरळूं लागली. तो व्याकुळ दिसूं लागला. रावणाचा कर्दनकाळ हातपाय गळून गेल्या-प्रमाणें करूं लागला. जानकीनें आपल्या प्रभूची ती अवस्था जाणली तशी ती सर्वांनींच जाणली होती. पण जानकी म्हणजे मूर्तिमंत चित्कळा! जिथें सगळे लोक हात जोडून हताश बसले तिथेंच तिला कांहीं तरी स्फुरलें. मुहूर्ताची शेवटची घटका बुडायला थोडाच अवकाश आहे, एवढ्यांत ती तिथून जरा दूर गेली आणि पुनश्च रामापुढें येऊन उभी राहिली.

"हें घ्या शिवलिंग. करा स्थापना!"

सीता लगबगीनें समुद्रावर गेली होती. तिथली ओलसर वाळू उपसून तिनें तिचें एक सुंदर घाटदार शिवलिंग बनवलें होतें आणि ऐन वेळीं रामरायाच्या हातीं आणून दिलें होतें. तिचें तें समयसूचकपण पाहून रामचंद्राचे डोळे कौतुकानें लुकलुकले. त्याचा अगतिकपणा नाहींसा झाला. निराशा धुऊन निघाली. सर्वांनींच सीतामाईच्या बुद्धिमत्तेची वाखाणणी केली. लक्ष्मणाला तर राहवलेंच नाहीं. तो म्हणाला. 'वैनी, किती ग शहाणी तूं!'

मग ऋषींनीं पुण्याहवाचन केलें. वेदमंत्रांच्या घोषांत आणि शिव-नामाच्या जयजयकारांत रामरायानें त्या लिंगाची स्थापना केली. जमलेली मंडळी त्यावर आतां पुष्पवृष्टि करणार, एवढ्यांत हनुमंताची

स्वारी मांडवाच्या दारांत उतरली. त्याच्या हातांत खास शिवानें दिलेलें लिंग होतें आणि मुद्रेवर विजयी होऊन आल्याचा आनंद होता. तो खरेंच वाऱ्यालाहि मागें टाकून तिथें आला होता.

पण आतां काय उपयोग! कार्यभाग होऊन गेला होता. तयार केलेल्या पीठावर शिवलिंग विराजमान झालें होतें. त्याची पूजाअर्चा त्याला दिसत होती आणि सगळे लोक त्याच्याकडे चमत्कारिक नजरेनें पहात होते. हनुमान ओशाळला. त्यानें आपल्या हातांतल्या लिंगाकडे पाहिलें. आतां त्याची गरज संपली होती. तें कुठें तरी टाकायचें अन् हात मोकळे करायचे. आतां त्या लिंगाचेंहि चीज नव्हतें अन् त्याच्या श्रमाचेंहि चीज नव्हतें. पहाडासारखा हनुमान्! पण त्याच्या डोळ्यांत तरारून पाणी आलें.

"प्रभो! काय केलेंत हें! आणखी थोडा वेळ वाट पाहिली असती तर—! माझ्यावर एवढी अवकृपा—"

पुढें त्याच्या कंठांतून शब्द फुटेना. तो रामप्रभूच्या चरणांवर पडला अन् दीनवाणें रडूं लागला. दुसऱ्या कोणीं त्याचा असा अपमान केला असता तर त्यानें धरणी कांपवली असती. पण इथें काय करील! रामचंद्र तर त्याचा जिवाआगळा धनी! त्याच्या भक्तीचें, सेवेचें, सुखाचें एकमेव स्थान! इथें त्याला भुवईसुद्धा उचलतां येत नव्हती. म्हणून तर त्याची दशा केविलवाणी झाली. आपल्या आजवरच्या सेवेवर आज पाणी पडलें असें त्याला वाटलें.

रामाला तें पाहवलें नाहीं. सीतेला, लक्ष्मणाला, कोणालाच पाहवलें नाहीं. रामानें त्याला उठवून प्रथम आपल्या हृदयाशीं धरलें. मग त्याचे डोळे आपल्या शेल्यानें पुसले अन् त्याला म्हटलें.

"भक्ता हनुमंता! तुझ्या अपमानांत माझी प्रतिष्ठा नाहीं. तूं भक्त तर मी भक्तवत्सल! तुझ्यामुळेंच माझें वैभव, तुझ्यामुळेंच माझें सामर्थ्य. उपट तें लिंग. अन् तं आणलेलें त्या ठिकाणीं ठेव. मी त्यावर मंत्रपुष्प वाहीन."

“ देवा, देवाऽऽ ! केवढी रे तुझी कृपा... ! ”

मारुति गद्‌गदून बोलला. त्याला झालेला परमानंद त्याच्या सर्वांगांतून चमकला. अखेर त्याचा विजय झाला होता. त्यानें तपाच्या बळावर शंकराकडून मिळविलेलें लिंगच त्याचा प्रभु स्थापणार होता. पूर्वीची स्थापना रद्द ठरणार होती. खरोखरच रामप्रभु त्याला कल्पद्रुम झाला होता.

मारुतीनें मग वेळ काढला नाहीं. तो उठला. धावतच त्या वालुका-



मारुति शिवलिंग उपटूं पाहतो

लिंगाकडे गेला. त्यानें दोन्ही हात त्या लिंगाच्या खालीं घातले. तो तें

खसकन् उचलणार होता अन् त्यांतला वाळूचा कणन्‌कण समुद्राकडे उधळणार होता. पण लिंग उचललें नाहीं. त्यानें आणखी थोडा जोर केला. पण तरीहि कांहीं झालें नाहीं. तो थोडा दचकला; पण लिंग उपटत नाहीं हा पराभव कबूल करायला त्याचं मन तयार नव्हतं.

जेव्हां हातांनीं काम भागेना, तेव्हां त्यानें आपल्या शेपटाचा विळखा त्या लिंगाभोंवतीं घातला अन् सगळी शक्ति एकत्र करून तें खेंचलें. त्यामुळें पृथ्वी डळमळली; पण लिंग मात्र तसूभरहि हाललें नाहीं. तें वालुकालिंग जणूं वज्रलिंग बनलें होतें. त्या ओढाताणीचा परिणाम एवढाच झाला कीं मारुतिच दूर जाऊन दाणकन् आदळला.

त्याला सर्वांगीं मार बसला. अंगाअंगांतून रक्त भळभळूं लागलें. एवढा बजरंगबली मारुति; पण त्या आघातानें एकदम मूर्च्छित पडला. सर्वांच्या आधीं धावत जाऊन त्याच्या पाठीवरून हात फिरवला, त्याचें रक्त पुसलें तें सीतामाईनें. तिचें मारुतीवर पुत्रवत् प्रेम होतें. अशोकवनांत दुःखें गाळीत बसलेली असतांना त्यानेंच रामाची मुद्रिका तिच्या ओंजळींत घालून रामरायाचें कुशल तिला कळवलें होतें. त्याचें आजचें हें दुःख तिला असह्य झालें. तिला वाटलें कीं, आपल्यामुळेंच हें सगळें घडलें. आपण जर तें वालुकालिंग बनवून पुढें केलें नसतें तर हा प्रसंग आलाच नसता.

रामराय पुढें झाला आणि त्यानें मारुतीला सावध केलें. तो डोळे उघडतो तर समोर कृपाळू रामचंद्र उभा! त्याला आपली चूक कळून आली. आपण वृथा अभिमानाला बळी पडलों असें त्याला वाटलें. त्यानें रामाचे पाय धरले अन् ते अश्रूंनीं भिजवले. रामानें त्याचें सांत्वन करून त्याला म्हटलें.

"तुझा भ्रमनिरास झाला, हें बरें झालें. तूं एकटाचसा काय; पण विश्वांतल्या साऱ्या शक्ती जरी एकत्र झाल्या तरी मीं स्थापलेलें हें लिंग उपटलें जाणार नाहीं. आतां कळला तुला त्याचा प्रभाव? तूं लिंग उपटायला गेलास म्हणजे साक्षात् शिवाचा अपराध केलास. त्याचेंच हें फळ तूला मिळालें."

या बोलण्यानें हनुमान् लाजला. त्याच्या कळा पार उतरल्या. मग त्याच्या समाधानासाठीं रामरायानें एक तोड काढली. त्यानें मारुतीला म्हटलें, कीं 'तूं आणलेलें शिवलिंग तूं मीं स्थापलेल्या लिंगासमोरच बसव. माझ्या शिवाचें नांव 'रामेश्वर' अन् तुझ्या शिवाचें नांव 'हनुमदीश्वर.' इथें येणारा प्रत्येक यात्रेकरू या दोन्ही लिंगांचें दर्शन घेऊन कृतार्थ होईल.

मारुतिरायानें मग तें लिंग रामेश्वरासमोरच स्थापलें आणि त्याला आपल्या श्रमांचें सार्थक वाटलें.

---